


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका




वर्ष २२ वें : अंक ३ रा

ऑक्टोबर–डिसेंबर १९४९



संपादक
यशवन्त दिनकर पेण्डरकर

❀ महाराष्ट्र ❀
साहित्य–पत्रिका
वर्ष २२ वें : अंक ३ रा
ऑक्टोबर–डिसेंबर १९४९



## ढगामागे ढग उभे........

ढगामागे ढग उभे, कर्धांचे आभाळीं :
अडवीत प्रकाशाचीं किरणें सगळीं

उघडलें जाईना नभाचें फाटक
सूर्याच्या रथाला जणू हो अटक......

अंगणांत लाविला मी चन्दनाचा मळा
प्रकाशाच्या मायेवीण सुकून चालला —-

कोसळा ढगांनो ! कोसळा तरी रे !
होऊं द्या चिखल, येऊं द्या सरी रे !!

चिखलांत जगवीन कसें तरी 'तरु'......
अता सूर्यतेजावीण नका देऊं मरूं......

विजेच्या गळ्याची तुम्हांला शपथ
सागरपित्याची तुम्हांला शपथ !

–अंगणांत लाविला मी चंदनाचा मळा
प्रकाशाच्या मायेवीण सुकून चालला—

—त्रि. म. कुलकर्णी

# वैदिक छंदःशास्त्र

लेखक :
ना. ग. जोशी

## आणि मात्रिक-छांदस-रचना

"छंदःशास्त्र-वैदिक आणि लौकिक" ( उत्तरार्ध—'म. सा. प.' जुलै--सप्टें.' ४९ ) या लेखांत श्री. य. ग. फफे यांनी वैदिक वृत्तातून संस्कृत कालांतील वृत्तें कशीं विकास पावलीं असावींत यासंबंधाने उद्बोधक व मनोरंजक माहिती दिली आहे. पण त्या लेखाच्या शेवटीं त्यांनी मात्रागणी जातिरचना व ( कालिक मात्रामापाची ) छांदस रचना यांबाबत केलेलीं अनुमानें, त्यांचें मौलिक स्वरूपच बरोबर आकलन न झाल्याने कोणाला पटतील असें वाटत नाही. वेदांतील पठण कडकपणें लगत्वनिष्ठ असतें. त्यामुळे अपवादात्मक व योगायोगाने आलेल्या रचनेवरून नियम सांगणें बरोबर नाही. केवळ अक्षर-संख्या हेंच सामान्य गमक तेथे सांपडतें.

(१) छांदस रचना वैदिक रचनेशीं समान आहे असें दर्शविण्यासाठी ते म्हणतात, "वैदिक छंदांप्रमाणेच मराठींतहि लघुगुरुत्वाचा विचार न करतां केवळ अक्षरसंख्येवर आधारलेले कित्येक छंद आहेत. सर्व प्रकारचे अभंग, घनाक्षरी, व कांही प्रकारच्या ओव्या यांचा यांत समावेश होतो. यांचे वैदिक छंदांशीं इतकें साम्य आहे की, यांच्या रूढ नांवाऐवजीं वैदिक छंदांचीं नांवें दिलीं तरी साजतील."

अभंगादि रचनेंतील छंदोरचनेचें स्वरूप सांगतांना कै. राजवाडे यांनी ही स्थूल अक्षरसंख्या सांगण्याची पद्धत पूर्वींच स्वीकारली. पण मराठींतील अभंगादि रचनेचें स्वरूप बाह्यतः लगत्वातीत असलें तरी उच्चारतः तें मात्रासंख्येच्या मापाचें असतें हें सहज पटण्या-सारखें आहे. या छांदस रचनेंतील सर्व अक्षरें लांब उच्चारावयाचीं असतात असा सिद्धांत कै. माधवराव पटवर्धनांनी मांडला व घनाक्षरीचें पठणरूप व अभंगांचें एक प्रकारचें पठण-रूप पाहतां तें योग्य वाटतें. गुजरातींत घनाक्षरी आहे व छांदस रचनेचा 'मनहर' छंद आहे व त्यापैकी घनाक्षरीचें पठणरूप तर लंबितोच्चारी असतेंच असें प्रो. रामनारायण पाठक यांनी निश्चित सांगितलें असून 'मनहर'बद्दलहि तसेंच म्हटलें पाहिजे असा निर्णय दिला आहे. ( "प्राचीन गुजराती छंदो, १९५" ) हा लंबितोच्चाराचा प्रश्न वादातीत नाही असें समजून बाजूला ठेवला तरी छांदस रचनेंतील चरण उच्चार किंवा पठण करतांना मात्रा-मापाच्या दृष्टीने सारख्या मापाचे ( 'क्वांटिटी'चे ) असतात हें त्यांचें प्लुतमात्रा समाविष्ट करून टाळी वाजवून म्हणण्याचें स्वरूपच सिद्ध करतें. तेव्हां त्यांतील अक्षरांची संख्या निश्चित सारखी असून मात्रांचें एकंदर मापहि जर सारखें आहे तर त्यावरून गणितानेहि प्रत्येक अक्षर दोन मात्रांएवढ्या कालाचें असतें असें दाखवितां येतें. येथे मुद्दा एवढाच कीं वेदांतील छंदांचें स्वरूप असें मात्रामापाचें syllabic quantity चें—असतें काय ? श्री. फफे यांचें एक उदाहरण घेऊं.

बाळ जातो दूर देशा । मन गेलें वेडावून
आज सकाळपासून ॥

याला ते 'त्रिपदा गायत्री' हा अष्टाक्षरी वैदिक छंद मानतात. श्री. फफे यांनी हें कडवें मोठ्याने म्हणावें म्हणजे त्यांना सहज आढळेल कीं त्यांतील अक्षरें

बाळ जातो दूर देशा । मन गेले वेडावून ।
आज सकाळपासून ॥

अशीं विलंबित उच्चारलीं जातात. नीट चालीवर म्हटल्यास तें कडवें आद्यतालकपूर्व अष्टमात्रिक त्रितालांत म्हटलें जातें. म्हणजे मात्रांचें माप दर ओळींत सारखें येतें.

अग्निमीळे पुरोहितम् । यज्ञस्य देवमृत्विजम् । होतारं रत्नधातमम् ।

या 'त्रिपदा गायत्री'चें पठण वरील कडव्यासारखें करतां येईल काय? म्हणजे वेदकालीं तें तसें म्हटलें जात होतें काय? याचें उत्तर 'नाही' हेंच आहे.

इतर छांदस उदाहरणांची हीच गत आहे म्हणून विस्तार करीत नाही.

(२) जातिरचनेसंबंधीं विचारांत तर याहूनहि गंमत आहे. श्री. फफे यांनी 'जाति-र्मात्राकृता भवेत्' असें नमूद केलें आहे, पण प्रत्यक्ष साम्य दाखवितांना चरणांतील सम-मात्रासंख्येचीं आवर्तनें तुलनेला न घेतां केवळ ध्रुवपद, अंतरा अशीं अंगें–जीं केवळ गौण आहेत तीं—विचारांत घेऊन कांही ऋचांतील पुनःपुनः येणारी ध्रुवपदसदृश रचना उध्दृत केली आहे. आता ध्रुवपद--अंतरा वगैरे असलेलीं पदें मात्राकृत जातिरचनेचीं अस-तात हें त्यांना विदित असतांहि त्या बाबतचें म्हणजे मौलिक गोष्टीसंबंधीचें साम्य न दाख-वितां गौण बाबतींतील वरवरचें साम्य दाखवून चालणार नाहीं. पुढे ते "तरत् स मंदी धावति" इत्यादि ऋचेंतील मात्रासंख्या '१३' सर्वत्र सारखी आहे म्हणून हें जातिरचनेचें द्योतक मानतात. सूक्ष्मतेने पाहतां येथें '१२' मात्रा दिसतील. चरणान्तींचें अक्षर दीर्घ मानावयाचें असा नियम वैदिक छंदांत मानला तर मात्रा तेरा भरतील. जातिरचनेप्रमाणे वाचूं जातां "तरत् स मंदी ऽ ऽ । धावति ।" किंवा "तरत् स मंदी । धा ऽ ऽ वति ऽ ऽ ।" असें पादाकुलकाचें सोळा मात्रांचें रूप सिद्ध होईल व मगच ती जातिरचना म्हणतां येईल. परंतु प्रत्यक्ष म्हणतांना असें म्हटलें जात नाही. उच्चाराचे वेळीं हीं वैदिक अक्षरें, उदात्त स्वरितादि स्वरामुळे, कमीअधिक मात्रामापाचीं होतात. शिवाय या स्वरितादि स्वरांचे चरणांतील स्थान निरपवाद सारखें नसतें. त्यामुळे मात्रामाप सारखें राहात नाही व म्हणून टाळी वाजवून सर्व चरण पादाकुलकासारखे म्हणतां येत नाहीत व त्यांतील मात्रिक आवर्तनें दाखवितां येत नाहीत. मुख्य अडचण अशी की या "तरत् स मंदी धावति' मधील, मात्रा सारख्या दाखविता आल्या तरी वैदिक छंदःशास्त्राप्रमाणे याच्या 'त्रिपदा गायत्री' छंदाची सर्व रचना तशी दाखवितां येईल किंवा काय? तसें दाखविणें अशक्य आहे. तेव्हां या बाबतींत "विविध जातिप्रकारांचेंहि मूळ वैदिक वाङ्मयांत आढळें असें दिसून येतें" असें विधान अतिव्याप्त आणि भ्रामक ठरतें.

मात्रासंख्य जातिरचना प्राकृतांतील अपभ्रंश भाषेंतून विस्तार पावली ही गोष्ट आज वादातीत मानली जाते. वैदिक रचनेंतून पुढे संस्कृत वृत्तांचा विस्तार झाल्याचें जें श्री. फफे यांनी नामसादृश्य व चरणसादृश्य यांवरून दाखविलें आहे तें जसें सर्व छंदोविचा-रक नमूद करतात तसेंच ते जातिरचना अपभ्रंश भाषेंतून विकास पावली असें सप्रमाण दाखवितात. गुजरातेंत कै० केशव हर्षद ध्रुव या महापंडितांनी **"गुजराती पद्यरचनानी ऐतिहासिक आलोचना"** या ग्रंथांत तें सविस्तर दाखविलें आहे व प्रो. ह. दा. वेलणकर यांनीहि आपल्या "अपभ्रंश छंदा"संबंधींच्या लेखांत तें संपूर्णपणें नमूद केलें आहे. कै. के. ह. ध्रुव म्हणतात,

"'कोकालिय' छंदाचे चारी चरण सोळा सोळा मात्रांचे रचलेले असतात :

यावं दुंक्खवा निरया इव वुत्ता

तत्थऽपि ताव चिरं वसितव्वं ।

तस्मा पेसल सांधगुणेसु
वाचॅम् मनं सततं परिरक्खे ।। ' सुत्तनिपात ' ३।१०।२२

" हा छंद आद्य संपूर्ण मात्रात्मक समचतुष्पदी छंद आहे.... 'सुत्त' कालांतील नव्या छंदांच्या विकासाचा क्रम याप्रमाणे जुळवितां येतो... प्रथम जुन्यानव्या संस्मृष्टीचे मिश्र छंद ( गण-मात्रा-बद्ध ), त्यानंतर सजातीय अशा दोन नव्या छंदांचा ' उपजाति ' प्रकारचा मिश्र छंद व अंतीं अमिश्र छंद ( वरील प्रकारचा ). " (" गुज पद्य. ऐति. आलोचना " पृ. १६४ )

छांदस रचना कोठून विकास पावली याचा दुवा अजून बेमालूम सांधला गेलेला नाही. प्रो. ह. दा. वेलणकरांनी अपभ्रंशांतील ' अर्ध चतुष्पदी ' रचनेवरून ' ओवी ' आली असें अनुमान केलें आहे. ते ही छांदस रचना लंबित किंवा दीर्घ उच्चारांच्या अक्षरांचीच प्रायः मानतात. ( " अपभ्रंश आणि मराठी वृत्तें " ) प्रो. पाठक गुजराती ' मनहर ' हिंदी ' कवित ' द्वारा आला असें लिहितात व हा छंद अपभ्रंश कालांत आस्तित्वांत नव्हता असें नमूद करतात.

कै. माधवराव पटवर्धनांनी जातिरचना ' अपभ्रंशां ' वरूनच झाल्याचें मानलें आहे. परंतु त्यांच्या ' छंदोरचनेचा ' विषय ऐतिहासिक आलोचनेचा नसल्यामुळे ते जाति किंवा छांदस रचना यांची पूर्वपीठिका तपासण्याच्या भरीस पडले नाहीतसें दिसतें. परंतु जाति व छांदस रचना यांचें निश्चित स्वरूप स्पष्ट करून त्यांचें नियमन केल्याचें श्रेय त्यांना द्यावयास गुजराती छंदःशास्त्रज्ञहि मागेपुढे पाहात नाहीत. आणि कै. पटवर्धनांनी दाखविलेल्या जाति-छांदस रचनेचें मूळ वैदिक छंदांत सांपडणें भाषिक दृष्टीने अशक्य आहे. केवळ चमत्कृति म्हणून गंमतीनें श्री. य. ग. फफे यांचीं या संबंधीचीं मतें वाचावीत. मात्र त्यांचें मूळ प्राकृत अपभ्रंशच असलें तर आहे हें अधिकारी विद्वानांचें मत लक्षांत ठेवावें.

श्री. फफे यांचें अक्षरगणी वृत्तांसंबंधीचे याच लेखांतील ( उत्तरार्धांतील ) सूचक लेखन स्वरूपतःच बरोबर वाटणारें व म्हणून विचारार्ह आहे एवढें मात्र अवश्य नमूद करावयास पाहिजे.

# श्री. फफे यांचें उत्तर

माझ्या एका मित्राने पत्रिकेचा अंक सहज चाळतां चाळतां ' क्लिष्ट ऋचांनी भरलेला हा तुमचा लेख कोण वाचणार आहे ' असा प्रश्न मला स्मितपूर्वक केला होता, पण श्री. ना. ग. जोशी यांनी तो लेख वाचून त्याचा परामर्श घेतला आहे म्हणून मी त्यांचे प्रथम आभार मानितों.

( १ ) अष्टाक्षरी तीन पादांनी होणाऱ्या ओवीस त्रिपदा गायत्री व चार पादांनी होणाऱ्या अभंगास अनुष्टुभ् म्हटल्यास साजेल असें मी लिहिलें आहे. यावर, ही ओवी व हा अभंग यांतील सर्व अक्षरें गुरु उच्चारलीं जात असल्यामुळे तसें म्हणतां येणार नाही असा श्री. जोशी यांचा आक्षेप आहे. पण त्रिपदा गायत्री व अनुष्टुभ् या छंदांत सर्व अक्षरें गुरु असूंच नयेत असें बंधन छंदःशास्त्रांत कांही सांगितलेलें नाही. यांतील सर्व अक्षरें गुरु असूं शकतात. अनुष्टुभांतील सर्व अक्षरें गुरु असलीं तर त्यास विद्युन्माला म्हणतात. विद्युन्माला

म्हणा की अभंग म्हणा, तें पोटप्रकाराचें नांव होईल; त्याचें अनुष्टुभ् हें सामान्य छंदोनाम कांहीं टळत नाहीं. असेंच त्रिपदागायत्री इत्यादींचें समजावें.

त्रिपदा गायत्री छंदांतील वैदिक ऋचा तीन चरणी ओवीप्रमाणे व अनुष्टुभ् छंदांतील ऋचा अष्टाक्षरी चतुष्पाद अभंगाप्रमाणे म्हणतां येणार नाहीत हें श्री. जोशी यांचें म्हणणेंहि खरें नाहीं. सर्व गुरु अक्षरांनी झालेल्या ऋचा तर तशा म्हणतां येतीलच पण अभंग म्हणतांना ऱ्हस्व अक्षरेंहि गुरु उच्चारतात तसें केल्यास इतर ऋचाहि अभंगाचे चालीवर म्हणतां येतील. वस्तुतः ताल, स्वर, राग यांप्रमाणेच पद्य म्हणण्याची चाल हाहि छंदःशास्त्राचा विषय नव्हे; पद्याचें स्वरूप (आकार) हाच छंदःशास्त्राचा विषय होय. म्हणून चालीविषयी लिहिणें येथें अप्रस्तुतच. तथापि श्री. जोशी यांनी चालीवर भर दिल्यामुळे वरील स्पष्टीकरण करणें प्राप्त झालें. शार्दूलविक्रीडिताची मंगळाष्टकी चाल, 'यास्यत्यद्य शकुंतलेति' इत्यादि म्हणण्याची करुणरसपूर्ण चाल आणि 'या भूपें पण जिंकिला' या रावणाच्या दर्पोक्तीची वीररसात्मक चाल यांचा शार्दूलविक्रीडिताचे लक्षणाशीं काय संबंध आहे? लक्षण हें पद्याच्या स्वरूपावरूनच ठरावयाचें, म्हणण्याच्या चालीवरून नव्हे.

'वेदपठन करतांना असें म्हणत नाहीत' ही मोठी अडचण श्री. जोशी यांनी उभी केली आहे. तसेंच उदात्तस्वरितादिकांचेंही अवडंबर उभें केलें आहे. पण पिंगलप्रणीत छंदःशास्त्रास हें कांहीं नडत नाहीं. अक्षरांवरील स्वरांचा छंदःशास्त्राशीं कांहीं संबंध नाहीं. त्यांत प्लुत उच्चारहि नसतो. केवळ गुरु व लघुच असतात, हें ग्लौ (१–१४) या पिंगलसूत्रांत स्वच्छच सांगितलेलें आहे. शिवाय पादाक्षरसंख्या जमविण्यासाठीं ऋचेंतील अक्षरांतही कसा फेरफार करून घ्यावा हेंहि पिंगलानें इयादिपूरणः (३–२) या सूत्रानें सांगितलें आहेच. एवढें पाहिल्यानंतर 'वेदपठनाचे वेळीं असें म्हणत नाहीत' ही अडचण वस्तुतः राहूं नये. वेदपठनाची पद्धति निराळी आणि छंदोगानाची पद्धति निराळी. माझ्या लेखांत याविषयी सोदाहरण विस्तृत विवेचन आहेच; म्हणून त्याची येथे पुनरुक्ति न करितां श्री. जोशी यांनी माझा समग्र लेख पुन्हा एकवार वाचण्याची तसदी घ्यावी अशी त्यांस नम्र विनंती मात्र करितों.

विविध जातिप्रकारांचें मूळहि वैदिक वाङ्मयांत आढळतें हें माझें विधान अतिव्याप्त व भ्रामक आहे असा श्री. जोशी यांचा आणखी एक आक्षेप आहे. जातिरचना अपभ्रंश भाषेंतून विस्तार पावली हें एक कारण त्यांनी दिलेलें आहे. पण अपभ्रंश भाषेंत जातिरचना करणाऱ्या आद्य कवींस हा प्रकार कसा सुचला असेल हा प्रश्न राहतोच. तो ज्यावरून साहजिकपणें सुचावा असें मूळ (बीज) वेदांत मला दिसलें, तेंच मी सुज्ञांच्या विमर्शार्थ त्यांस सोदाहरण सादर केलें आहे. जातिप्रकाराचा आजवर विस्तारलेला संपूर्ण वटवृक्ष वेदांत आहे असें व्यापक विधान माझें नाहीं. त्याचे सूचन ज्यावरून होईल असें मूळ (बीज) वेदांत आहे असें माझें फारच मर्यादित विधान आहे. त्यासाठीं कांहीं उदाहरणें मी दिलीं आहेत तीं पुरेशीं होतील असें मला वाटलें. पुष्कळ उदाहरणें विस्तार-भयास्तव देतां आलीं नाहीत. पण आणखी उदाहरणें द्यावयास हवीं होतीं असें श्री. जोशी यांच्या आक्षेपावरून म्हणावें लागतें. जातिरचना प्राकृतांतच उगम पावली असें विधान करून त्याचे पुराव्यादाखल श्री. जोशी यांनी १६ मात्रांचे पाद असलेलें एक प्राकृत पद्य दिलें आहे. पण तें ज्याचें अनुकरण म्हणतां येईल असली रचना ऋग्वेदांत विपुल आढळते. उदाहरणार्थः—

भूरि हि ते सवना मानुषेषु
भूरि मनीषी हवते त्वामित्
मारे अस्मन्मघवञ्ज्योक् कः ॥ ऋ. ७।२२।६
एवा न इन्द्र वार्यस्य पूर्धि
प्र ते महीं सुमतिं वेविदाम ॥ ऋ. ७।२४।६
प्र वो महे महिवृधे भरध्वं
प्रचेतसे प्रसुमतिं कृणुध्वम् ॥ ऋ. ७।३१।१०
विदुः पृथिव्या दिवो जनित्रं
शृण्वन्त्यापो अध क्षरन्तीः ॥ ऋ. ७।३४।२
शं नः सुकृतां सुकृतानि संतु
शं न इषिरो अभिवातु वातः ॥ ऋ. ७।३५।४
प्रपथे पथामजनिष्ट पूषा
प्रपथे दिवः प्रपथे पृथिव्याः
उभे अभि प्रियतमे सधस्थे
आ च परा च चरति प्रजानन् ॥ ऋ. १०-१७-६
इमं विधन्तो अपां सधस्थे
पशुं न नष्टं पदैरनु ग्मन्
. गुहा चरन्तमुशिजो नमोभिः ॥ ऋ. १०-४६-२

वरील उदाहरणांतील सर्व पाद १६ मात्रांचे आहेत इतकेंच नव्हे तर ते चतुर्मात्रिक चार गणांनी झालेले आहेत. अशाच स्वरूपाचे पाद सातव्या मंडळाच्या चौतिसाव्या व पसतिसाव्या सूक्तांत विपुल आहेत. असे समान स्वरूपाचे विपुल पाद एकत्र आढळल्याने त्यांच्या स्वरूपाकडे दृष्टि वेधून पुढील कवींस तत्सदृश पद्यरचना करण्याची स्फूर्ति व्हावी हें स्वाभाविकच म्हणावें लागेल. म्हणून अशा वैदिक पादांस मी जातिरचनेचें मूळ बीज मानितों.

अलीकडील कित्येक लेखक षोडशमात्रिक पादांच्या सर्वच पद्यांस पादाकुलक म्हणतात. पण प्राचीन छंदःशास्त्रांतील पादाकुलक इतकें व्यापक नाहीं. हेमचंद्रादिकांनी पादाकुलकाशिवाय षोडशमात्रिक पादांचेच पद्धति, भूषणा व मुक्तावली असे आणखी तीन जातिप्रकार सांगितले आहेत. ऋग्वेदांत या सर्वांचीं उदाहरणें आढळतात.

हें १६ मात्रांच्या पादासंबंधानें झालें. तेरा मात्रांचे पाद ४ + ४ + ५ = १३ या स्वरूपाचे असल्यास त्या जातिप्रकारास ' खंड ' म्हणतात. तरत् स मंदी धावति ही ऋचा खंड जातीची आहे. हें तींत द्विखंड चिन्हें योजुन तिला मारून मुटकून सोळा मात्रांची बनविण्याचा प्रयत्न करणें निरर्थक आहे. याच तेरा मात्रा ६ + ४ + ३ = १३ अशा स्वरूपांत असल्या तर त्या जातिप्रकारास ' उपात् ' असें म्हणतात. वैदिक गायत्र पाद १३ मात्रांचे बहुसंख्य आहेत. त्यांमध्यें हे दोन्ही जातिप्रकार वैपुल्यानें आढळतात. ४+४+४ +४+ ग = १८ मात्रा. अशा स्वरूपाचा सुमंगला नामक जातिप्रकारहि वैदिक ऋचांत विपुल आढळतो. विस्तारभयास्तव यांचीं उदाहरणें येथें देतां येत नाहींत. तो एका स्वतंत्र लेखाचा विषय होईल. ध्रुवपद, कडवें, अंतरा यांचा उल्लेख माझ्या लेखांत आहेच. तेव्हां या सर्वांचा साकल्यानें विचार करून विविध जातिरचनेचें मूळ वैदिक वाङ्मयांत सापडतें की नाहीं हें वाचकांनी व श्री. जोशी यांनीहि अनाग्रहपूर्वक पहावें अशी माझी त्यांस विनम्र सूचना आहे.

य. ग. फके

# ललितरहस्य

ले०— डॉ. म. वि. आपटे,
बी. एसूसी.; एम्. बी. बी. एस्.
कैवल्यधाम, लोनावळे.

ज्याच्या योगाने नेत्रादि इन्द्रियांस सुख होतें त्यास ललित म्हणतात. कांही चित्रण तसेंच कांही भाषणहि ललित असतें. पण सर्वच चित्रें किंवा भाषणें ललित नसतात. गायन हा भाषणाचा ललित प्रकार आहे. भाषण ललित करण्याकरतां त्यांत कांही विशेष गुण उत्पन्न करावे लागतात. सरसकट सर्व चित्रणहि ललित नसतें, तें ललित करण्याकरतां त्यांतहि कांही विशेष गुण आणावे लागतात. गाणें ऐकणारापेक्षां गाणें गाणाराला त्याचप्रमाणें चित्र पाहणारापेक्षा चित्र रेखाटणाराला हे कलाविशेष अधिक अवगत असावे लागतात. आपण सर्वच कलावन्त नसलों तरी रसज्ञ तरी असणें अवश्य आहे. म्हणून रसजिज्ञासेच्या दृष्टीने ललितासंबंधीं कांही शास्त्रीय विवरण करण्याचें येथे योजिलें आहे.

दृश्य ललित अनेक प्रकारचें असतें. मूर्तचित्र हा एक प्रकार, पटचित्र हा दुसरा प्रकार. त्यांतच चल आणि अचल असेहि प्रकार संभवतात. गायन आणि वादन हे श्राव्य ललिताचे प्रकार होत. एकंदरींत समाजामध्ये रुचिवैचित्र्य बरेंच असतें. दृश्यामधील तसेंच श्राव्यामधील कांही प्रकार कोणास आवडतील कोणास आवडणार नाहींत. तथापि बहुत प्रकारचें दृश्य आणि श्राव्य एकत्र केले तर त्यांतला एकाद दुसरा प्रकार सोडला तरी एकंदरींत तें ललित बहुजनांस आवडत नाही असें होणार नाही. नाट्य आणि बोलपट यांत अशीच योजना केलेली असल्यामुळे हीं ललित रूपें आज लोकप्रिय झालेलीं आहेत. नाट्यामध्ये ललित आणि जिवन्त मूर्तीच डोळ्यापुढे आणतात, तर बोलपटामध्ये त्यांचीं पटचित्रें चालतीं बोलतीं करून डोळ्यासमोर मांडतात. नाटकामध्ये कथाव्यक्तीऐवजी त्यांची सोंगें नाचविलीं जात आहेत ही जाणीव ठेवूनच प्रेक्षक नाटक पाहतात. तसेंच चित्रपटांतहि मूर्तीऐवजी चित्रें आणि तींहि बहुधा त्यांतील रंगाविरहित अशीं प्रेक्षक पाहत असतात. तरी देखील त्यांत बरेच ललित गुण असतात त्यामुळे तीं रम्य वाटतात.

## दृश्य लालित्य

दृश्य लालित्य किंवा रम्यता अनेक गुणावर अवलंबून आहे. दृष्टीने आपणांस तांबडा हिरवा जांभळा हे वर्ण कळतात, चौरस वाटोळीं इत्यादि आकृती कळतात, लहान मोठा असे आकार कळतात, आणि दूर निकट असें स्थलहि कळतें. वर्णसंवेदना हा दृष्टीचा विशेष आहे. नेत्रांखेरीज इतर इंद्रियांना ही संवेदना नसते. आकार व आकृति हे स्थलाश्रयी गुण आहेत. ते मूलतः स्पर्शाने समजतात पण दीर्घाभ्यासाने नेत्रांसहि कळूं शकतात. स्थल म्हणजे दृश्याचें नेत्रापासून अन्तर हें जितकें अधिक तितका त्यावरून येऊन नेत्रांत शिरणारा प्रकाश कमी असा एक संबंध असतो. दुसरा एक संबंध असा की हें अन्तर जितकें अधिक तितका त्याचें प्रतिबिंब नेत्रांत उमटविण्यास नेत्रांना पडणारा आयास कमी. अतिदूरचा मात्र पदार्थ नेत्रांत अनायासें प्रतिबिंबित व्हावा अशी स्वाभाविक योजना असते. दृश्यावरून येणारा प्रकाश ज्या नेत्रतारकेंतून आंत शिरावयाचा तिचा आकार कमी अधिक करण्याची योजना नेत्रांत असते. शिवाय त्या प्रकाशाचे किरण अधिक वाकवण्याकरतां

नेत्रांतील भिंगाची फुगवटी कमी अधिक करण्यांचीहि योजना असते. या शिवाय दोनहि नेत्र एकाच दृश्यावर एकदम रोखण्याचीहि योजना असते. या योजना वापरण्यास आयास पडतात, त्या आयासाच्या मानावरून दृश्याचें नेत्रापासून अंतर किती तें आपणांस कळू शकतें. प्रकाशाची एक विशेष तीव्रता नेत्रास सुखावह असते. त्याहून ती कमी पडल्यास ज्ञान संदिग्ध होतें आणि अधिक झाल्यास नेत्रास पीडा होते. अर्थात् यथार्थ ज्ञान होत नाही. प्रकाशाची तीव्रता कमी करण्याकरतां नेत्रतारकेचा आकार कमी करणें शक्य असतें पण ती वाढवण्याकरतां तिचा विकास मात्र विशेष करतां येत नाही. दृश्य दूर किंवा अदूर असेल त्याप्रमाणे त्यावरून येणारा प्रकाश केंद्रित करण्याच्या व्यवस्थेस दूरतेची मर्यादा नसते अदूरतेची असते. आकाशांतील तारकांचा प्रकाश केंद्रित करण्यास आयास नकोत, पण स्वतःचेंच नासाग्र पाहण्यास आयास इतके पडतात की तितके करण्याचें सामर्थ्य सहसा कोणास नसतें.

एखादा पदार्थ ललित असण्याकरतां त्याचा वर्ण योग्य तीव्रतेचा असला पाहिजे आणि तो दूरवर असला पाहिजे हें तर खरेंच, पण त्याची आकृतिहि विशेषगुणान्वित असली पाहिजे. एखाद्या पदार्थाला आकृति असते याचाच अर्थ असा की त्याच्यांत अनेक टिंबें शेजारीं शेजारीं रचलेलीं असतात. त्या सर्वांचा समूह म्हणजे त्याचें बिंब होय. त्यांतील एकेक टिंबागणिक एकेक प्रतिटिंब डोळ्यांत उमटावयाचें असतें. प्रत्येक टिंबाचें स्थान वेगवेगळें असतें म्हणून सर्व टिंबांवरून दृष्टि फिरवल्याखेरीज नेत्राला बिंब दिसत नाही. एकच टिंब हें सर्वांत लहान दृश्य होय. डोळ्यासमोर जर एखादी सरळ रेषा उभी असली तर ती पाहण्याकरतां तिच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत दृष्टि फिरवावी लागते. असें करतांना विशेष आयास होतात, पण ते आरंभापासून शेवटपर्यंत एकाच दिशेने होतात. वक्ररेषा पाहतांना अर्थात् प्रत्येक टिंबास दिशापालट होतो. म्हणून आयास क्लेशावह होतात. एका सरळ रेषेने कोणतेंहि बिंब सिद्ध होत नाही. बिंब होण्यास सरळ रेषाच घ्यावयाच्या तर त्या निदान तीन घ्याव्यां लागतात. अर्थात् अशा बिंबाला तीन कोचदार वळणें येतात, म्हणून तीनदा तरी नेत्रास क्लेश पडतात. सरळ रेषेऐवजी वर्तुळ रेषाच घेतली तर बिंब सिद्ध होतें. तें न्याहाळतांना दृष्टि वळवावी लागतेच पण ती सतत एकाच क्रमाने वळवावी लागते. त्यामुळे क्लेश कमी होतात. वर्तुलदर्शन हें त्रिकोणदर्शनाहून सुखावह कां असतें तें यावरून कळून येते. त्रिकोणावरून हात फिरवला तर तो तीन ठिकाणीं अडखळतो आणि वर्तुळावरून फिरवला तर अडखळत नाही. त्यासारखेंच हेंहि आहे.

घोटीव वळणदार आकृति कोमल आणि सुन्दर दिसते. त्याच्या उलट कोरीव आणि खोचदार आकृति कठोर आणि असुन्दर दिसते. करकरीत मांसपिंड उठून दिसणें हें कठोरपणाचें लक्षण किंवा पुरुष--लक्षण आहे. आणि मृदु वळणदार शरीर हें स्त्रीचें लक्षण आहे. एकाद्या स्त्रीने केस पिंजारले भुवया मोडल्या आणि हात ताठ उभे केलें तर ती उग्र दिसूं लागते. उलट एकाद्या पुरुषाने केस चापून चोपून बसवले आणि हातांतील मांसपिंडांचा कोरीवपणा वस्त्राने झाकून टाकला तर तो सौम्य दिसूं लागतो. स्त्रीची आकृति ललित असावी आणि पुरुषाची भव्य असावी अशी अपेक्षा असते.

दर्शनसौकर्य हा एकच लालित्यप्रद गुण आहे असें नाहीं, तर लालित्य गुणाकारांतील तो एक गुणक आहे. अत्यंत दर्शनसुकर आकृति म्हणजे वर्तुल, पण तीच कांहीं अत्यंत ललित आकृति आहे असें नाही. अत्यंत अस्ताव्यस्त खाचाखोचा असणारी आकृति मात्र

ओंगळ असते यात शंका नाही; त्याचात्याचा का असेनात, पण त्या एका वर्तुळांत असल्या तर त्यांत कांही लालित्य उत्पन्न होतें. एकाच लांबीच्या शेपन्नास काड्या अस्ताव्यस्तपणें एका शेजारीं एक टाकल्या तर त्यांत कांही लालित्य दिसत नाही. परंतु प्रत्येक काडीचें एकेक टोक अशीं सर्व काड्यांचीं टोकें एकत्र आणलीं तर त्यात एका ठिकाणाहून निघालेल्या किरणांची शोभा उत्पन्न होते. किरण-परिसरातील सूर्यबिंब तसेंच चंद्रबिंब ललित समजतात. त्यांतल्या त्यांत सूर्यबिंब हें प्रखरतेमुळे कमी ललित गणलें जातें. सूर्याची उपमा दुरपास आणि चंद्राची खीस देतात तें यामुळेच. ताडाचें पान हें वाटोळें परंतु कोचाकोचांचें असतें त्यात थोडेंबहुत लालित्य वाटोळेपणामुळे आलेलें असतें. केळीचें पान आकृतीने ललित असतें. तेंच चिरटतें तेव्हां त्यांतील लालित्य कमी होतें. नारळीचें पान निसर्गतःच चिरटलेलें असतें. त्याचें लालित्य अर्थातच कमी समजतात. तथापि अशीं दहा वीस पानें एका ठिकाणाहून उमटल्यामुळें एकंदर पालवीच्या आकृतींत वाटोळेपणामुळे कांही लालित्य उत्पन्न होतें. केळीच्या सर्व अंगांत कांहींना कांही लालित्य असतेंच. सर्वांगीं मृदुता असते. त्यांतल्या त्यांत खुंटांत विशेष असते. पानें वळणदार, फळें वळणदार, फळांना धारण करणारा दांडा कमानदार अशी सामग्री असल्यामुळे केळ ही लालित्याचें प्रतीक मानली गेली आहे.

## नैसर्गिक दृश्य ललित

कोणत्या तरी शंभर जातींच्या झाडांचीं पानें ( किंवा पर्णदलें ) गोळा करून त्यांच्या आकृति तपासाव्या. त्यापैकी ९५ हून अधिकांच्या आकृतींत मधोमध प्रधानशीर आणि तिच्या दोन्ही अंगांस समसमान आकृतीचे दोन पक्ष, अशी रचना आढळते. आंबा, बकुल, सोनचाफा, बोर, चाफा, हिरवा चाफा, पारिजात, यांचीं पानें आणि पळस, पांगारा, अशोक, बाहवा, जाई-जुई, चमेली यांचीं पर्णें आणि पर्णदलेंहि डाव्या उजव्या अंगीं समानतेने रचलेलीं आढळतात. कमळाचें पान वाटोळें असतें. त्याला प्रधानशीर नसते, तरी देखील तें समपक्ष असतेंच. पक्षभेद दाखवणारी रेषा उमटलेली नसते इतकेंच काय तें. कडू निंबासारखें एखादेंच झाड असें आढळतें की त्याच्या पानाच्या प्रधानशिरेच्या डाव्याउजव्या अंगाच्या रचनेंत विषमता आढळते. समपक्ष पानें ललित असतात यांत संशय नाही. आता अशा शेकडो ललित समपक्ष पानांवरच दृष्टि देऊन बसलों तर एक प्रकारचा कंटाळा येतो. एकविधता ही बहुत असली की कंटाळवाणी, विरस उत्पन्न करणारी असते. त्यांत विविधता उत्पन्न झाली म्हणजे, तशी विविधता उत्पन्न करणारी वस्तु पृथक्पणें जरी ललित नसली तरी ती ललितांच्या समवायांत विविधता आणण्याच्या गुणामुळेच ललित ठरते. कडुलिंबाचीं पर्णदलें बारीक असतात आणि त्यांची असमपक्षता ठळक नसते, शिवाय तें झाडहि मोठें असतें, तें लहानशा बागेंतील झुडपामध्ये सामावत नाही; म्हणून विषमपक्ष पानें असणारीं कांही झुडपें बागेंत लावण्याची प्रथा रूढ झाली आहे. दर्शन--सौकर्याच्या जोडीला विविधता किंवा वैचित्र्य हा एक लालित्याचाच गुणक आहे असें यावरून कळून येतें.

समपक्षता मुख्यतः दोन प्रकारची असते. उभी किंवा आडवी. उभी समपक्षता जितकी सुखद असते तितकी आडवी नसते. केळीचें पान उभें धरलें असतां जितकें ललित दिसतें तितकें आडवें धरलें असतां दिसत नाही. उभें गंध जी शोभा देतें ती आडवें गंध देत नाही. पूर्वी बायका एक आडवी कुंकवाची रेघ कपाळीं लावीत. केवळ तेवढी रेघ

अशोभच दिसेल म्हणून मधोमध एक टिळा लावण्याची चाल असे. टिळ्यामुळे मध्य उठावदार होऊन डावेउजवेपणा स्पष्टपणें दाखवला जातो हा त्याचा उपयोग आहे. संथ पाण्यांत पडलेलें सभोंवारच्या झाडाझुडपाचें प्रतिबिंब आडवी समपक्षता उत्पन्न करते ती रम्य असते हे खरें पण ती उभ्या समपक्षेइतकी रम्य कधीच भासत नाही. रस्त्याच्या दोन्हीहि कांठाला एकजात सारख्या आकारआकृतीची झाडी उभी असली म्हणजे जी शोभा दिसते ती तळ्याच्या कांठच्या झाडांच्या प्रतिबिंबाने कधीच उत्पन्न होत नाही. पाण्यांतलें प्रतिबिंब आकार-आकृतींनी जितकें बिनचूक असतें, तितकें रस्त्याच्या एका काठच्या झाडांचें कल्पिलेलें दुसऱ्या काठच्या झाडांचें प्रतिबिंब बिनचूक नसतें; तरी देखील तो कमी बिनचूक देखावाच अधिक रम्य दिसतो. उभी रेषा आणि आडवी रेषा यांत शारीरिक संवेदनांच्या दृष्टीने मोठाच भेद आहे. उभी रेषा ही पृथ्वीच्या सर्वेकप आकर्षणाची रेषा असते. आपल्या शरीरास या आकर्षणाची जाणीव सतत असते. शास्त्रीय परिभाषेखेरीज ती नीटपणें व्यक्त करतां येत नाही इतकेंच. आपणा सर्वांचीं शरीरें उभीं किंवा बसलेलीं ( आडवीं नव्हे ) पाहण्याचेच प्रसंग आपणास पुष्कळ येतात. आपलीं शरीरें उभ्या रेषेस अनुलक्षून समपक्षतेनें रचलेलीं असतात त्यामुळे आपणास आडव्यापेक्षा उभी समपक्षता अधिक ललित वाटते. उभी समपक्षता हा लालित्याचा आणखी एक गुणक ठरतो.

## कृत्रिम दृश्य ललित

एकविधता आणि विविधता या दोनहि गोष्टी एकमेकांविरुद्ध असून नेत्रांस सुखावह कशा ? हा प्रश्न येथे उत्पन्न होतो, तो आता सोडविला पाहिजे. वीस प्रकारच्या वीस आकृतींच्या संचापेक्षा एकाच प्रकारच्या वीस आकृतींचा संच पाहणें सुखावह असतें. परंतु एकाच्याच वीस आवृत्त्या शेजारीं शेजारी 'पाहण्यापेक्षा एका प्रकारच्या चार चार आकृति असे पाच वेगवेगळया आकृतींचे संच शेजारीं शेजारीं ठेवले तर ते अधिक ललित दिसतात. आता हेच संच एका आडव्या रेषेच्या वर अर्धे आणि खाली अर्धे असे मांडून ठेवले तर ते जितके ललित दिसतात त्यापेक्षा ते एका उभ्या रेषेच्या डाव्या उजव्या अंगास सारखेपणें रचले असतां अधिक ललित दिसतात. एकाच प्रकारचे श्रम करीत राहणें यांत सौकर्य आहे पण त्यांत एकाच कर्मेंद्रियाचा संच उपयोगांत राहण्याने कांही आवृत्त्यानंतर शिणतो. त्यास निराळी क्रिया दिली असतां शीण जातो आणि नवी क्रिया नीट करतां येते. आपले दोन डोळे वर खाली असे नाहीत, डावे उजवे असे आहेत, त्यामुळे डाव्या उजव्या सारख्या वस्तू न्याहाळण्यांत जें सौकर्य आहे तें खाली वर सारख्या वस्तू पाहण्यांत नाही. आवृत्तता आणि विविधता या दोन गोष्टी प्रथम विरुद्ध वाटतात पण त्या तशा नाहींत, हें आता कळून येतें. नेत्र हें ज्ञानेंद्रिय आहे हें खरें पण तें त्याच वेळीं त्याच कामासाठी कर्मेंद्रिय म्हणूनहि काम करतें. ज्ञानसंपादनाकरतांच नेत्राला आयास करावे लागतात. आयास म्हटले की सुकरता, दुष्करता, परिश्रम, विश्रान्ति, या गोष्टी आल्याच. सुकरतेंत सुख आहे दुष्करतेंत क्लेश आहे आणि परिश्रमांनंतर विश्रांतींत पुनः सुख आहे.

अक्षर आणि अंक यांची जी लिपि रूढ आहे ती प्रस्तुत संबधांत तपासून पाहण्याजोगी आहे. शून्य हा अंक संपूर्ण समपक्ष आकृतीचा आहे. तो लिहिण्यास आणि वाचण्यास अतिशय सोपा आहे. त्यांत नवशिकादेखील सहसा चूक करीत नाही. १,२;३,हे अंक एक-पक्षी आहेत. नवशिका विशेषतः डावखोरा ते उलटे लिहिण्याचा संभव असतो; पण उलटे म्हणजे

उजव्या ऐवजी डाव्या वळणाचे, वर डोकें खाली पाय असे नव्हे. ३ आणि ६ यांचे घोटाळे नेहमी होतात. कारण डोळ्याला ते सारखेच भासतात. डावें वळण आणि उजवें वळण इतकाच भेद त्यांत आहे. त्या पाहण्यात सारखीच सुकरता आहे. ४ हा अंक समपक्ष आहे. ५, ७, ८, ९ हे एकपक्ष आहेत. त्यांच्या बाबतींत नवशिके पुष्कळ चुकतात. ५,८ यांची वळणें उलट लिहितात आणि ७ च्या ऐवजी ९ लिहितात, कारण त्या एकमेकांच्या जणू उजव्या डाव्या प्रतिकृतीच आहेत. इंग्रजी वर्णमालेंतील बी आणि डी यांच्या आकृती उभ्या प्रतिकृती आहेत. त्यांच्या बाबतींत मुलेंच काय पण प्रौढ सुद्धा वारंवार चूकभूल करतात असा अनुभव आहे. इंग्रजी बी आणि पी या एकमेकांच्या आडव्या प्रतिकृती आहेत त्यांच्या बाबतींत अशी चूकभूल सहसा घडत नाही, कारण वर खाली यांतला भेद नेत्राला सहज कळतो.

## दृश्य वर्णांचें लालित्य

वर्णज्ञान हें नेत्राखेरीज दुसऱ्या कोणत्याच इंद्रियाने होत नाही. आद्य वर्णसंवेदना तीन प्रकारच्या आहेत. ज्ञानेंद्रियासंबंधींच बोलावयाचें तर तांबडा, हिरवा, जांभळा हेच तीन आद्य वर्ण होत. इतर वर्ण त्यांच्या मिश्रणाने सिद्ध होतात. उद्भिद सृष्टीचा रंग बहुतांशीं हिरवा असतो. तो नेत्रास आनंद देतो. जांभळा रंग शांतता देतो आणि तांबडा उत्तेजन देतो. तांबडा आणि पांढरा रंग बहुधा फुलांत दृष्टीस पडतो. त्यामुळे त्यांकडे लक्ष वेधलें जातें. पूर्ण निळा किंवा जांभळा रंग फुलांत क्वचितच आढळतो. बहुधा त्याच्या जोडीला पांढरा रंग किंवा तांबुस रंग यांच्या छटा असतात. त्यामुळे चित्ताचें आकर्षण होतें. जास्वंद, पळस, पांगारा, अशोक, सावर यांचीं तांबडीं फुलें, गुलाब, कण्हेर, सदाफुली पद्म, यांचीं गुलाबी फुलें, बाहवा, ब्रिटी, कर्णकोट यांचीं पिवळीं फुलें, जाई, जुई, कुंद मोगरा, नागदमनी, यांचीं पांढरीं फुलें फार मनोवेधक असतात.

## जीव आणि जड यांचें लालित्य

फुलांचें आकर्षण त्यांच्या रंगामुळेच केवळ असतें असें नाही, तर आकृतीमुळेहि असतें. बहुतेक फुलें आपल्या अक्षाभोवती समरूपतेनें रचलेलीं असतात. कण्हेर, तगर, गुलाब, कमळ, जास्वंद, हीं सर्व अशा तऱ्हेचीं फुलें आहेत. अगस्ता, शेवरी, पळस, घेवडा हीं फुलें एका उभ्या पातळीच्या दोन बाजूस समरूपतेनें रचलेलीं असतात. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे त्यांना, डावें-उजवें अशीं दोन समसमान अंगें असतात. कर्दळीचें फूल पाहिलें तर, त्यांत कोणत्याच प्रकारची सरूपता नसते. त्याचे सर्व अवयव भिन्नरूप असतात. इतकें असूनहि तें कमी रम्य असतें असें नाही. एक तर त्याचा वर्ण रम्य असतो आणि दुसरें असें की त्याच्या प्रत्येक अवयवाला वेगवेगळी खरी पण वळणदार आकृति असते. त्यामुळे तें ललित दिसतें. एकंदरींत उद्भिद सृष्टीमध्ये वृक्षापेक्षा लता अधिक ललित असतात आणि त्या झाडांच्या आधारानें वाढतात. म्हणून वृक्षांना पुरुषाची आणि लतांना स्त्रियांची उपमा देतात. वृक्षांची एकंदर आकृति वळणदार असते पण त्यांचा मुख्य सांगाडा म्हणजे खोड आणि त्याच्या शाखा यामध्यें वळणें थोडीं आणि कोपरेच फार त्यामुळे त्यांत कठोरपणा येतो. उलटपक्षीं लतांमध्यें खोडांतहि वळणें विपुल असतात. कांही लतांचीं खोडें तर झाडाला विळखे घालीतच त्यावर चढतात. त्यामुळे त्यांत मृदुता आणि लालित्य प्रत्ययास येतें.

पशुपक्षी झाडाझुडांच्या आश्रयाने राहतात. त्यांच्यापैकी पक्षिगणाच्या शरीराकडे पाहतां त्यांत आकृति-वैचित्र्य थोडें आणि वर्णवैचित्र्य पुष्कळच आढळतें. एक मयूर

ह्याच पक्षी पाहिला तर त्याच्या पिसाऱ्यांत सर्वच वर्ण विपुल आढळतात. त्याशिवाय आणखी पुष्कळ पक्षी असे आहेत की त्यांच्या अंगांत रंगांची रेलचेल झालेली असते. पक्ष्यांचें शरीर सर्वदा उभेंच असतें. पशूंचें मात्र सर्वदा आडवें असतें. वानर हा एकच पशु असा आहे की, त्याचें शरीर पुष्कळवेळा उभें असतें. पशु-पक्षी या दोघांसहि डावीं उजवीं समान अंगें असतात. पक्ष्यांच्या इतकें वर्णवैचित्र्य पशूंत नसतें, आकृतिवैचित्र्य मात्र थोडेंसें अधिकच असतें. स्त्रीमध्ये मृदुता आणि पुरुषामध्ये कठोरता माणसाप्रमाणे पशूंत आढळते, पण पक्ष्यांत आढळत नाही किंबहुना उलटच परिस्थिति आढळते. मयूराच्या मादीमध्यें नराच्या दशांशहि लालित्य नसतें. उलट सिंह हिंस्र तशी सिंहीणहि हिंस्रच असते तरी ती सिंहापेक्षा मृदूच दिसते. त्या आयाळाच्या योगाने सिंहास कठोरता येते तें आयाळ सिंहिणीस नसतें.

आतांपर्यंत आपण जीवसृष्टीचाच विचार केला. पण जडसृष्टींतहि लालित्य असतें त्याचा विचार केला पाहिजे. विस्तीर्ण आकाश विस्तीर्ण जलाशयांतील संथ पाणी यांनी नेत्रास आराम मिळतो. विस्तीर्ण पर्वतश्रेणीहि दुरून पाहिली असतां साजरीच दिसते, कारण अशा अंतरावरून तिच्यातील खरखरीतपणा लोपलेला असतो. इतर रंगांपेक्षा आकाशाच्या निळया रंगाचीच छटा विशेष ठळक दिसत असते. जड सृष्टि भव्य असते. पण ती स्वत: होऊन आपल्या आंगलट येत नसल्यामुळे भव्य प्राण्यांची भीति वाटते तशी जडांची वाटत नाही. जड आणि जीव सर्व सृष्टींत ठिकठिकाणीं लालित्य भरलेलें आहे. तें उत्कट करून दाखविणें हें कलावन्ताचें काम आहे. [ अपूर्ण.

---

## राजकवि तांबे यांचा साहित्यविषयक पत्रव्यवहार:—

[ संपादक— ना. बा. पराडकर, प्रका० ना. बा. गोडबोले, अध्यक्ष, शारदोपासक मंडळ, लष्कर—ग्वाल्हेर. मूल्य रु. २॥ ]

अग्रगण्य कवि भास्करराव तांबे यांचा ' कला आणि नीति ' हा प्रबंध त्याचप्रमाणें त्यांचीं अध्यक्षीय भाषणें प्रकाशित झालेलीं आहेत. तेव्हां, त्यांचीं काव्याबद्दल ( आणि ललित वाङ्मयाबद्दल ) मतें व प्रमेयें बरींचशीं उपलब्ध आहेत. त्या मतप्रदर्शनांत एक प्रकारची विचारपूर्वक प्रस्थापना असणें स्वाभाविक आहे. तीं मतें अभ्यासजन्म मंथनांतूनच उद्भवलेलीं असतात. हें जरी खरें असलें तरी उत्स्फूर्तता तितकीशी नसणार. ती उत्स्फूर्तता खाजगी स्वरूपाच्या पत्रांतच खरीखुरी पाहावयास सापडणार. अभ्यासजन्य चिंतनांतून हीं मतें बनलेलीं असलीं तरी तीं व्यासपीठासाठीं नसल्यामुळे—तीं प्रदर्शनासाठीं नसल्यामुळे सहजतेचें सौंदर्य व आवेग ह्यांत अधिक असणार हें उघड आहे. अशा साहित्यविषयक खाजगी पत्रांचा हा संग्रह प्रकाशित करून ग्वाल्हेरच्या शारदोपासक मंडळाने अभिनंदनीय कामगिरी बजाविली आहे. कविवर्य तांबे यांचा अभ्यास करणाराला ह्या पत्रसंग्रहाचा खासच उपयोग होईल. उपलब्ध साहित्यांत ही मोलाची भर पडली आहे.

पुस्तकाची पृष्ठसंख्या १३६ आहे. पैकी पहिलीं ५६ पृष्ठें इंग्रजींतील पत्रव्यवहारास खर्ची पडलीं आहेत. नामवंत साहित्यिकांना हीं पत्रें लिहिलेलीं असल्यामुळे अर्थातच मतांच्या अभिव्यक्तीला उच्च प्रकारची पातळी आली आहे. स्पष्टवक्तेपणा, आत्मविश्वास, ऋजुता, इत्यादि वैयक्तिक गुणविशेषांचा आविष्कारहि ह्य आहे. शारदोपासक मंडळाच्या ह्या कामगिरीचें चीज व्हायला पाहिजे.

पुस्तक-परीक्षण

# वासुकाका जोशी व त्यांचा काळ

लेखक :
वि. स. खांडेकर

'वासुकाका जोशी व त्यांचा काल' हें सहाशें पृष्ठांचें पुस्तक वाचण्याकरिता हातांत घेणारा तरुण वाचक क्षणभर गोंधळून जाईल यांत शंका नाही. त्याच्या मनांत येईल— वासुकाका जोशी हे 'चित्रशाळे' सारख्या संस्थेचे कर्तबगार संचालक होते. पण ते कांहीं टिळक-गोखल्यांप्रमाणे राजकीय पुढारी किंवा आपटे-केळकरांप्रमाणे विविध, विपुल व लोकप्रिय साहित्य निर्माण करणारे साहित्यिक नव्हते. काळाच्या वाळवंटावर ज्यांचीं पाऊलें दीर्घ काळ उमटून राहतात अशा लोकांत त्यांची गणना होत नव्हती. मग त्यांच्या या एवढ्या जाडजूड चरित्रांत लेखकानें काय बरें लिहिलें असावें ?

त्या तरुणाला निदान मी तरी हंसणार नाही. मी त्याच्या पूर्वीच्या पिढींतला असल्यामुळे वासुकाकांच्याविषयी मला अधिक माहिती आहे. त्यांच्याविषयींच्या अनेक कुतूहलजनक आख्यायिका निरनिराळ्या वेळीं भिन्न भिन्न लोकांकडून मी ऐकल्या आहेत. स्थूल दृष्टीनें पाहिलें तर जगांत माणसांचे तीन वर्ग असतात. पहिला वर्ग कालप्रवाहाला आपल्या कर्तृत्वानें वळण लावणाऱ्यांचा. हा नेहमींच मूठभर लोकांचा वर्ग असतो. कर्तृत्ववान राजकीय पुढारी, निष्ठावंत समाजसुधारक, प्रतिभाशाली साहित्यिक, शास्त्राभ्यास हें जीवितकार्य मानणारे संशोधक इत्यादि मंडळींचा या वर्गांत समावेश होतो. माणसांचा तिसरा वर्ग बहुसंख्य सामान्य व्यक्तींचा असतो. हीं माणसें कालप्रवाहाविरुद्ध पोहूं शकत नाहीत किंवा त्याला वळणहि लावूं शकत नाहीत. तीं प्रवाहपतित असतात. राजकीय उत्पात, सामाजिक संघर्ष, वाङ्मयीन वादविवाद इत्यादिकांचे थोडेफार संस्कार त्यांच्यावर होतात. पण ते संस्कार प्रकृतिधर्मांप्रमाणे व परिस्थितीप्रमाणे भिन्न भिन्न होत जातात. नव्या गोष्टी निवडून किंवा पारखून घेण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं नसतें. समाजांतला दुसरा वर्ग मात्र ह्या दोन्ही वर्गांपेक्षा निराळा असतो. पहिल्या वर्गांत आढळून येणारें अपूर्व व्यक्तिमत्त्व किंवा असामान्य प्रतिभा या लोकांच्या अंगीं नसते. पण केवळ प्रवाहपतित होण्याइतकें त्यांचें व्यक्तित्व दुर्बळहि असत नाही. त्यांच्या व्यक्तित्वांत अनेक लहानमोठीं वैशिष्ट्यें असतात. त्या वैशिष्ट्यांच्या आधारावरच त्यांनी आपल्या जीवनाला डोळ्यांत भरण्यासारखा आकार आणलेला असतो. या वर्गांत ज्यांची कुणीहि सहज गणना करावी असेच वासुकाका जोशी होते. पण हें ठाऊक असूनसुद्धा देवगिरीकरांनी त्यांचें एवढें मोठें चरित्र काय लिहिलें आहे असें प्रश्नचिन्ह माझ्या डोळ्यापुढे उभें रहायचें तें राहिलेंच.

या पुस्तकाच्या एका महत्त्वाच्या गुणाचा प्रारंभींच उल्लेख केला पाहिजे. ज्याचें चरित्र लिहायचें तो फार मोठा मनुष्य आहे अशी सोईस्कर अर्धसत्यात्मक कल्पना गृहीत धरून लिहिलेला हा ग्रंथ नाही. देवगिरीकरांना वासुकाकाविषयी आपुलकी आहे, आदर आहे. पण त्यांच्या या भावनांत अंधतेचा भाग नाही. पुस्तकाच्या उपसंहारांत ते म्हणतात, "काकांचें चरित्र हें एका सामान्य गृहस्थाचें चरित्र आहे. काकांनी आपल्यामागे ग्रंथसंपत्ति

ठेवली नाहीं किंवा एकादी मोठी संस्थाहि ठेवली नाहीं. काळाच्या रुंद व लांबलचक रस्त्यावर त्यांनी आक्रमलेली पाऊलवाट पुसूनहि जाईल. पण कुणी एखादा जिज्ञासु या पाऊवाटेने कोण गेलें होतें असा माग काढील तर त्याला एक प्रसिद्धिविन्मुख, एक विरोध आणि विसंगति यांनी भरलेला, कळकळीने, तळमळीने, धडपडीने, निरलसतेने हळूहळू पथ आक्रमण करणारा पथिक गेला होता एवढा सुगावा लागेल. तो विद्वान नव्हता, तो वक्ता नव्हता, तो संघटक नव्हता. पण स्वातंत्र्यदेवीच्या पूजामंदिरांत त्यागाच्या पुष्पांची लाखोली वाहिली जात असतां स्वतःच्या श्रद्धेचें एकुलतें एक सुमन वाहणारा प्रामाणिक पुजारी होता, एवढी तरी नोंद काळ करील.''

चरित्रनायकाविषयीचा लेखकाचा दृष्टिकोन अंधविभूतिपूजेपासून असा अलिप्त असल्याने या ग्रंथांत व्यक्ति या नात्याने ज्या प्रकरणांत वासुकाकांचें चित्रण आलें आहे तीं सारीं वाचकाला केवळ मनोरंजकच नव्हेत तर बोधप्रदहि वाटतात. 'नेपाळ प्रकरण', 'काकांचा परदेशप्रवास,' 'अमेरिकेंत,' 'चीनमध्यें,' इत्यादि प्रकरणें वाचतांना प्रत्येक मनुष्य आपल्या आयुष्यांत निदान एक तरी चांगली कादंबरी लिहूं शकेल असें कां म्हटलें जातें याचा उलगडा होतो. सामान्य मनुष्याच्या आयुष्यांतहि अद्भुतरम्य क्षण येऊन जात असतात हेंच खरें. त्या क्षणांशिवाय त्याला आपलें जीवन अळणी वाटेल अशा समजुतीने काळपुरुष तें कदाचित् निर्माण करीत असेल! नेपाळद्वारे जपानशीं संधान बांधण्याकरता वासुकाका जोशी व खाडिलकर यांनी सुमारें पन्नास वर्षांपूर्वी नेपाळांत जावें व आपलें राजकारण यशस्वी व्हावें म्हणून तिथें मंगलोरी कौलांचा कारखाना काढावा. ही गोष्ट त्या काळच्या कादंबरीकाराच्या कल्पनाकक्षेंत सुद्धा येणें शक्य नव्हतें. पण ती सत्यसृष्टींत उतरली आहे. १९४२ च्या लढ्याच्या पार्श्वभूमीवर चित्रपट काढणाऱ्या लोकांपैकी कुणीहि अजून हें चरित्र वाचलेलें दिसत नाही. त्यांच्यापैकी एखाद्याच्या हाताला हें लागलें असतें तर हा मंगलोरी कौलांचा कारखाना रुपेरी पडद्यावर कुठे ना कुठे तरी निश्चित दिसला असता.

स्वातंत्र्यप्रेमामुळे निर्माण झालेल्या या अद्भुत रसाइतका आकर्षक नसला तरी त्याच्याहूनहि सामाजिकदृष्ट्या अधिक उपकारक असा दुसरा एक रस वासुकाकांच्या जीवनांत आढळतो. तो म्हणजे त्यांचें विविध कणखर व्यक्तित्व. त्यांच्या व्यक्तित्वांत कुठल्याहि प्रकारचा लिबलिबितपणा नाही. जें पटेल तें करायचें, जें इष्ट वाटेल तें आचरणांत आणायचें हा त्यांचा बाणा आहे. बाह्यतः या वृत्तींत असामान्य असें कांहीं दिसत नाही. पण निग्रहावांचून, विशिष्ट श्रद्धेवांचून ही वृत्ति माणसांच्या अंगीं बाणत नाहीं. सर्वसामान्य मनुष्य दिवसेंदिवस अधिक यांत्रिक होत चालल्यामुळेच की काय त्याच्या जीवनांत या वृत्तीचा आविष्कार कमी प्रमाणांत आढळूं लागला आहे. पण खऱ्याखुऱ्या सामाजिक प्रगतीच्या दृष्टीने ही वृत्ति फार महत्त्वाची आहे. वासुकाकांच्या या वैशिष्ट्याचें एक उदाहरण म्हणून त्यांच्या निसर्गोपचारावरील श्रद्धेचा उल्लेख करायला हरकत नाही. या श्रद्धेचें वर्णन करतांना देवगिरीकर लिहितात, निसर्गोपचाराचा त्यांना इतका नाद लागला कीं चित्रशाळेंत ते अमेरिकेचीं बहुतेक सर्व निसर्गोपचाराचीं मासिकें विकत घेऊ लागले. त्यांनी दुसरें वाचनच सोडलें. मॅक्फेडनचा फिझिकल कल्चरचा एन्सायक्लोपीडिआ त्यांनी विकत घेतला. या पुस्तकांच्या वाचनाने आणि अनुभवाने ते शारीरशास्त्रविशारद झाले. कोणी आजारी दिसला की पाण्यावर, दुधावर, भाजीच्या पाण्यावर किंवा मोसंब्याच्या रसा-

वर रहायाला ते त्याला सांगत. शेवटीं शेवटीं ते स्वतः दर शनिवारीं ३०।४० कागदी लिंबांच्या रसावर रहात असत. कोणत्या रोगाला कोणती ट्रिटमेन्स वर्ज्य व कोणतीं अनुकूल हें सर्व कांहीं त्यांना ठाऊक होतें. त्यांनी आपल्या या पद्धतीने कांहीं रोगी बरे केले. वासुकाकांचें हें वर्णन वाचतांना त्यांचा हा नाद अतिरेकाला गेला असावा असें एखाद्याला वाटण्याचा संभव आहे. पण कशाने ना कशाने तरी वेडीं होणारीं माणसें समाजांत असल्याशिवाय त्याची प्रगति कधींच होऊं शकत नाहीं, हें लक्षांत घेतलें म्हणजे उपचारांच्या बाबतींतल्या वासुकाकांच्या स्वतंत्र बुद्धीचें कौतुक वाटतें. या गोष्टीविषयी केवळ एक परिच्छेद न लिहितां देवगिरीकरांनी सबंध प्रकरण खर्ची घातलें असतें तरी बरें झालें असतें. सध्याचा काळच तसा आहे. चार पांच वर्षांपूर्वी पेनिसिलिन ह्या औषधाचें नांवसुद्धां आपल्यांतल्या सामान्य मनुष्याला ठाऊक नव्हतें. पण आता त्याला खरूज झाल्याबरोबर मोठमोठे डॉक्टर पेनिसिलीनची इंजेक्शनें देऊं लागले आहेत.

वासुकाकांच्या वैयक्तिक जीवनाचा या ग्रंथांतला असला भाग फार तर दीडदोनशें पृष्ठें भरेल. पुस्तकाचा उरलेला मोठा भाग वासुकाका ज्या काळांत जन्मले आणि वाढले त्याच्या चित्रणाने व्यापला आहे. पुस्तकाच्या नांवांत 'व त्यांचा काल' हे शब्द समाविष्ट करून देवगिरीकरांनी अ तल्या मजकुराशीं तें सुसंगत करण्याचा प्रयत्न केला आहे हें खरें. पण हें पुस्तक वाचतांना एक गोष्ट वाचकाला राहून राहून खटकल्यावांचून राहात नाहीं. ती म्हणजे यांतल्या अनेक प्रकरणांत दिलेल्या विविध घटनांचा व विस्तृत माहितीचा वासुकाकांच्या जीवनचित्राशीं असलेला अल्पसंबंध हें होय. शास्त्रीबुवांचा परिचय, निबंधमाला, लोकहितवादींचें युग, रानडेयुग, हिंदुमुसलमान दंगे, गांधीराजकारणांत येतात, काँग्रेसमधील बंडखोरी वगैरे अनेक प्रकरणांचीं नुसतीं नांवें वाचलीं तरी आपण गेल्या शभर वर्षांचा महाराष्ट्राचा इतिहास वाचीत आहों की समाजांतल्या एका कर्तबगार पुरुषाचें चरित्र वाचीत आहों याविषयी मन साशंक होतें. कोणत्याहि दृष्टीने पुढारीपण न लाभलेली व्यक्ति तिच्या कालाच्या पार्श्वभूमीवर चित्रित करणें हें मोठें कलात्मक काम आहे. तें देवगिरीकरांना साधलेलें नाहीं. ऐतिहासिक माहिती व स्वतःचीं मतें यांनी भरलेलीं असलीं प्रकरणें या पुस्तकांत विशोभित दिसूं नयेत म्हणून त्यांचा वासुकाकांच्याशीं प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष रीतीनें आलेला संबंध सूचित करण्याची दक्षता त्यांनी घेतली आहे. पण अनेक ठिकाणीं तो संबंध स्वाभाविक, महत्त्वाचा अथवा जिव्हाळ्याचा वाटत नाहीं. असलीं पुष्कळशीं प्रकरणें वाचल्यानंतर चरित्रनायक व त्याचा काल यांच्या बाबतींत 'अस्माकं बदरीचक्रं युष्माकं बदरीतरुः बादरायण संबंधो यूयं यूयं वयं वयम्॥' या संस्कृत श्लोकाची आठवण झाल्याशिवाय राहात नाही. कालप्रवाह व वासुकाकांच्या जीवनाचा प्रवाह हे या पुस्तकांत जसे मिसळावेत तसे मिसळले गेले नाहीत. त्यांचा संगम झालेला नाही; संकर झालेला आहे. त्यामुळे त्यांचें भिन्नत्व मनाचा विरस केल्यावांचून राहत नाही.

असें होण्याचें मुख्य कारण आपल्या कालाच्या पार्श्वभूमीवर एखादी व्यक्ति—त्यांतल्या त्यांत असामान्य नसलेली व्यक्ति चित्रित करणें हें पांडित्याचें कार्य नसून प्रतिभेचें काम आहे. केवळ व्यासंगाने साध्य होणारी ही गोष्ट नाहीं. दोन रंग मिसळून तिसरा निराळा सुंदर रंग निर्माण करावा त्याप्रमाणे अशाप्रकारच्या पुस्तकांत कालप्रवाह व व्यक्तिवैशिष्ट्य यांचा मनोहर संगम झाला पाहिजे. व्यक्ति व काल यांच्या क्रियाप्रतिक्रियांचे आलेख त्यां०

सविस्तर चित्रित व्हायला हवेत. या ग्रंथांत हा गुण जवळ जवळ अभावरूपानेच आढळतो. तो असाध्य आहे असें मात्र नाहीं. लक्ष्मीबाई टिळकांचीं 'स्मृतिचित्रें' वाचणारांना सामान्य व्यक्तीच्या सूक्ष्म जीवनाचित्रणांतून तिची पार्श्वभूमि असलेला काळ किती प्रभावी व परिणामकारक रीतीने रंगवितां येतो याची पुरेपूर कल्पना यायला मुळीच हरकत नाही. स्टीफान झ्वाइगच्या अनेक प्रबंधांतहि व्यक्ति आणि काल यांचे परस्परावर होणारे परिणाम एकरूपतेने चित्रित करण्याचें सामर्थ्य मोठ्या प्रमाणांत आढळतें. 'थ्री मास्टर्स' या तीन श्रेष्ठ साहित्यसेवकांविषयींच्या त्याच्या ग्रंथांतलें डिकेन्सविषयीचें पन्नाससाठ पृष्ठांचें प्रकरण वाचलें म्हणजे त्यांत व्यक्त झालेल्या कलेचा शतांशहि देवगिरीकरांच्या पुस्तकांत आढळत नाही अशी जाणीव होऊन मनाला विषाद वाटल्यावांचून रहात नाही.

या पुस्तकांतली महाराष्ट्राच्या गेल्या शंभर वर्षांतल्या विकासाची व त्या विकासाला कारणीभूत झालेल्या थोर पुरुषांची माहिती पूर्वी निरनिराळ्या ग्रंथांत येऊन गेली असली तरी देवगिरीकरांनी तिचें संकलन आपल्या विशिष्ट दृष्टीने केलें आहे. त्यामुळे तिच्यांत नावीन्य नसलें तरी वाचनीयता आहे. विशेषतः २१० पृष्ठानंतर 'समाजसुधारणेच्छु पुढाऱ्यांचें प्रतिज्ञापत्रक' या सदराखालची शपथ-पत्रिका व तिच्या वरच्या सह्या वाचकांना अनेक दृष्टींनी विचार करायला लावतील. १८९० सालीं तयार केलेल्या या प्रतिज्ञापत्रकावर लो. टिळक, भारतसेवक गोखले, कादंबरीकार हरीभाऊ आपटे, नाटककार गोविंद बल्लाळ देवल प्रभृति भिन्न भिन्न क्षेत्रांत चमकून गेलेल्या व्यक्तींच्या सह्या आहेत. या सह्यांतलीं बाळ गंगाधर टिळक दस्तुर खुद्द किंवा हरि नारायण आपटे हीं अक्षरें मोडींत वाचताना केवळ वाचकाचें ऐतिहासिक कुतूहलच जागृत होत नाही. गेल्या साठ वर्षांचें कालचक्रहि त्याच्या डोळ्यापुढे गरगरां फिरूं लागतें. पांच तपांपूर्वी सर्वसामान्य साक्षर मनुष्य मोडी लीलेने लिहूं शकत असे. मराठीच्या या शीघ्र लिपीची पुढील काळांत कशी अवहेलना झाली आणि आज मोडी लिहितां येणें तर लांबच राहो पण तें वाचतां येण ही सुद्धां केवढी अवघड कला होऊन बसली आहे हें लक्षांत आलें म्हणजे मनाला वाईट वाटतें. जुन्यांतलें चांगलें कायम ठेवून त्याची नव्याशीं सांगड घालण्याची शक्तिच आपल्याला नाही कीं काय अशी कुशंका मनाला चाटून जाते. पण मोठमोठ्या पुढाऱ्यांच्या आणि साहित्यसेवकांच्या या प्रतिज्ञापत्रकाखालच्या मोडी सह्या पाहून मनांत येणाऱ्या विचारापेक्षा ही शपथपत्रिका वाचतांना तिथें जी दुसरी खळबळ उडते ती शतपटीने विषादकारक आहे. या पत्रिकेंतलें पांचवें कलम 'दारू पिणार नाही' असें आहे. या शपथपत्रिकेला साठ वर्षें झालीं. स्वराज्य आलें. पण या कलमांत नमूद केलेली गोष्ट सरकारला सक्तीने लोकांवर—अगदी सुशिक्षितांवर सुद्धां—लादावी लागत आहे. सदरहू पत्रिकेंतलें चौथें कलम 'मुलाचा हुंडा किंवा मुलीचे पैसे घेणार नाही' असें आहे. या बाबतींत तर सुशिक्षित वर्गाची प्रगति उलट दिशेनेच झाली आहे असा अद्यापिहि अनेकांना अनुभव येत असेल. आय्. सी. एस्. पासून मॅट्रिकपर्यंत पूर्वी जें हुंड्याचें कोष्टक होतें त्यांतले आंकडे सध्यांच्या महागाईमुळे बदलले असतील. पण हुंडा घेण्यामागच्या बाजारी मनोवृत्तींत मात्र फार तर शेंकडा पांचदहा लोकांच्या बाबतींत अंतर पडलें असेल. या दोन्ही कलमांपेक्षा सातवें कलम अधिक महत्त्वाचें आहे. त्या कलमांत खालील मजकूर आहे. 'आपल्या प्राप्तीचा निदान $\frac{१}{२०}$ आमच्याप्रमाणे शपथा घेणाऱ्या मंडळींच्या सार्वजानिक कामाकडे देत जाऊं.' या कलमांतून व्यक्त झालेलें सामाजिक मन गेल्या साठ वर्षांत सक्रिय रीतीने सर्रास विकसित झालें असतें, तर आजच्या

महाराष्ट्राचें स्वरूप फार निराळें दिसलें असतें. महाराष्ट्राचें भवितव्य काय आहे याविषयी सध्या अनेक पंडित व देशभक्त चिंताग्रस्त होऊन विचार करीत आहेत. त्यांच्या चिंतनांतून कांही चांगलें बाहेर पडलें तर तें दैवच आहे. पण तें भवितव्य उज्ज्वल करण्याचा एक साधासुधा सोपा मार्ग साठ वर्षांपूर्वी आपल्या सामाजिक नेत्यांनी या सातव्या कलमांत सुचविला होता असें मला वाटतें. शास्त्रीय पद्धतीचा समाजवाद आपल्या देशात विविध संघर्षांशिवाय रूढ होणें शक्य दिसत नाही. पण तो रूढ होईपर्यंत ज्यांना ज्यांना नैतिक मूल्यांची व सामाजिक कर्तव्यांची जाणीव आहे त्यांनी त्यांनी अवश्य आचरणांत आणावें असें हें शपथपत्रिकेंतलें सातवें कलम आहे.

या प्रतिज्ञापत्रकासारख्या अनेक मनोरंजक व विचारप्रेरक गोष्टी देवगिरीकरांच्या माहितींत आणि विवेचनांत आल्या आहेत. पण त्यांच्या या विभागांतले दोन दोष जाणवल्यावांचून रहात नाहीत. पहिला, सर्व माहिती व्यवस्थित गोळा करून ती सुसंगत रीतीने मांडण्याच्या बाबतींतला आहे. तो रचनेचा दोष म्हणतां येईल. या दोषांमुळे वाचक निबंधमालेची माहिती आधीं वाचतो. तिच्यांत विष्णुशास्त्र्यांनी लोकहितवादींवर चढविलेल्या हल्ल्याचें सविस्तर वर्णन त्याला आढळतें. लेखक न्यायाधीशाच्या भूमिकेवर उभा नसून तो विष्णुशास्त्र्याची वकिली करीत आहे असा भास निर्माण होण्याइतकें याबाबतींतलें देवगिरीकरांचें विवेचन तो कसेंबसें पचनीं पाडतो. (पृष्ठ ५८ ते ६२). आणि मग पुढे ८७ व्या पृष्ठावर ' लोकहितवादींचें युग ' हें प्रकरण सुरू होऊन लोकहितवादी उर्फ गोपाळ हरि देशमुख यांचा जन्म १८२३ सालीं झाला ' या वाक्यापासून त्यांच्या परिचयाला प्रारंभ होतो. या रचना-दोषांमुळे या पुस्तकांतील माहितीचीं सर्व प्रकरणें सैल वाटतात. चिकित्सक ऐतिहासिक दृष्टि अगर सामाजिक जीवनांतल्या विरोधविकासाची जाणीव यांच्यापेक्षा आपल्याला प्रिय असलेल्या मतांचें मंडन करण्याची इच्छाच लेखकाच्या मनांत तीव्रतेने वास करीत असावी असें देवगिरीकरांचीं हीं कालचित्रणाचीं प्रकरणें वाचतांना राहून राहून मनांत येतें.

दुसरा दोष यापेक्षा अधिक महत्त्वाचा आहे. रानडे-टिळकांपासून केळकर-खाडिलकरांपर्यंतच्या महाराष्ट्राच्या गेल्या साठ वर्षांच्या जीवनांत चमकलेलीं सर्व माणसें आता मृत्यूच्या पडद्याआड गेलीं आहेत. त्यांच्याकडे अंध अभिमानाने अथवा अभिनिवेशांनं पाहण्यापासून पुढील पिढ्यांचा कोणताहि फायदा होणार नाही. देवगिरीकरांना प्रस्तावना लिहितांना या गोष्टीची जाणीव स्पष्टपणें झाली असावी असें दिसतें. प्रस्तावनेंत ते म्हणतात, ' जुन्या काळाचीं भांडणें हीं अशाप्रकारें आपल्या जीवनाचा विकास करीत असल्यामुळे त्यांच्याकडे आपण दयार्द्र व स्नेहपूर्ण दृष्टीने पाहूं या ' या वाक्यांत सूचित झालेली भूमिका निःपक्षपाती टीकाकाराला शोभेल अशीच आहे. पण ग्रंथलेखन आधीं होऊन गेल्यामुळे असो अथवा अन्य कारणामुळे असो या तात्त्विक भूमिकेला चिकटून राहण्याची दक्षता त्यांनी सर्वत्र घेतलेली नाही. लोकहितवादींबद्दल ते म्हणतात, ' या गृहस्थांच्याबद्दल पुष्कळ आधुनिक लेखकांना कळवळा आला आहे. त्यांना चिरंजीव करण्याचें बरेंचसें श्रेय विष्णुशास्त्री चिपळूणकरांना दिलें पाहिजे. " हीं दोन वाक्यें वाचलीं म्हणजे लेखक पूर्वग्रहदूषित आहे असें मनांत आल्यावांचून रहात नाही. लोकहितवादींच्या लेखनशैलींत चिपळूणकर—आगरकरांची चमक नसल्यामुळे व त्यांना जें कांही समाजाला सांगायचें होतें तें पुढे अनेक

प्रतिभासंपन्न सुधारक लेखकांनी विविध रीतींनी समाजाच्या मनावर बिंबविल्यामुळे त्यांच्या वाङ्मयाचें सर्वसामान्य वाचकाला पुढे फारसें आकर्षण उरलें नाही हें खरें आहे. पण त्यामुळे त्यांच्या विचारवंतपणाला अथवा ऐतिहासिक श्रेष्ठ स्थानाला बाध येण्याचें मुळीच कारण नाही. प्रत्येक लेखकाच्या लिखाणाची आयुर्मर्यादा निरनिराळ्या कारणांवर अवलंबून असते. पण केवळ त्या आयुर्मर्यादेनेच आपण लेखकाच्या कर्तृत्वाचें मूल्यमापन करूं लागलों तर त्याला आपण कधींहि न्याय देऊं शकणार नाही. लोकमान्य टिळकांचे लेख आज कितीक वाचले जातात ! पण त्या लेखांनीच इंग्रजी राज्य पायापासून गदगदा हलविण्याची इच्छा मध्यम वर्गांत निर्माण केली हें ऐतिहासिक सत्य नाही काय ? कोल्हटकर-खाडिलकरांचीं नाटकें आज फारशीं वाचलीं जात नाहीत. म्हणून काय मराठी रंगभूमीचा विकास घडवून आणण्याचें श्रेय या दोघांना कोणी नाकारील ? एकेकाळीं वाचकांना गुदगुल्या करणारे, त्यांच्या अंगावर रोमांच उभे करणारे शिवरामपंत परांजपे यांचे अनेक लेख आजच्या पिढीतल्या वाचकांना अनेक दृष्टींनी सामान्य वाटले तर तेवढ्यावरून शिवरामपंतांनी आपल्या तेजस्वी लेखणी-या द्वारे महाराष्ट्रांत वृद्धिंगत केलेली स्वातंत्र्यलालसा मोलाची नव्हती असें म्हणणाऱ्याची गणना आपण अरसिकाच्या सदरातच करणार नाही काय ?

लोकहितवादींवर लिहितांना देवगिरीकर किती एकांगी दृष्टीने लिहितात हें पाहण्याजोगे आहे. लोकहितवादींनी आपल्या एका पत्रांत खालील उद्गार काढले आहेत, ' शंभर इंग्रजांत पांच लबाड असतात. पण शंभर हिंदुलोकांत पांच प्रामाणिक असतात. तेव्हा यांचेकडे मोठे अधिकार दिले तर लोकांची स्थिति नीट राहणार नाही. जे गुण राजकर्त्यांमध्ये असावे ते हिंदुलोकांमध्ये नाहीत.' या उद्गारांवर देवगिरीकर मल्लिनाथी करतात, ' इंग्रजांच्या प्रामाणिकपणाविषयी व हिंदूंच्या अप्रामाणिकपणांविषयी केवढी ही खात्री ! ' ही खात्री केवढी आहे हा महत्त्वाचा प्रश्न नाही. ती खरी आहे की खोटी आहे ? स्वातंत्र्य मिळाल्याचा आनंद गेलीं दोन वर्षे आपण उपभोगीत आहों. पण हा आनंद राष्ट्रीय अप्रामाणिकपणाने पदोपदीं आणि क्षणोक्षणी डागळला जात आहे हें देवगिरीकरांच्या कानांवर अद्यापहि आलें नाही काय ? मोठमोठे काँग्रेस पुढारी सामाजिक नीतिमत्ता एकसारखी खालावत आहे असें मधूनमधून सांगत असतात. तो काय त्यांचा केवळ विनोद आहे ? परदेशीं घाण माल पाठवून बेअब्रू करून घेणारे आमचे व्यापारी, पदोपदीं प्रत्येक वस्तूचा काळाबाजार करणारे आमचे दुकानदार, देशहितापेक्षां किंवा सार्वजनिक नीतिमत्तेपेक्षां आपल्या तुंबडीची अधिक काळजी करणारे आमचे अधिकारी, इत्यादिकांच्या कारवायांमुळे आज आपण किती दूषित व दीन जीवन कंठीत आहों हें काय देवगिरीकरांना सविस्तर वर्णन करून सांगायला हवें ? झोपलेल्याला जागें करतां येतें पण झोंपेचें सोंग घेणाऱ्याला जागें करणें अशक्य आहे. देशांतलें आजचें राजकीय, सामाजिक, शैक्षणिक आणि आर्थिक जीवन जो थोड्याशा बारकाईनें पाहील त्याला कैक तपांमागे लोकहितवादींनी केलेल्या वरील कठोर विधानांत सत्यांश होताच होता हें कबूल करावें लागेल. आपल्या या सामाजिक अधःपातांचीं कारणें अनेक असूं शकतील. ते गुण वाढवित असाच इंग्लंडचा इतिहास घडत गेला. भारतीय संस्कृतीच्या गोंडस नांवाखाली आपण भोंगळपणाने जगत गेलों आणि नव्या काळाला आवश्यक असलेल्या राष्ट्रीय सद्गुणांच्या विकासाला आंचवलों. अशा कांही रीतीने सद्यःस्थितीची मीमांसा करणें निराळें.आणि जिकडे तिकडे प्रजा केविलवाणे-

पणानें रडत असतांना राज्याचा बंदोबस्त ठीक आहे अशा समजुतींत आक्षेपकांना मूर्ख ठरविणें निराळें.

केवळ लोकहितवादींच्याच नव्हे तर आगरकर–रानडे वगैरेंच्या बाबतींतहि लेखकानें याच दृष्टिकोनानें विवेचन केलें आहे. त्याच्या या विवेचनाच्या बाबतींत उलटसुलट पुष्कळ बोलतां येण्याजोगें आहे. पण ती चर्चा करण्याचा अधिकार तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, आचार्य भागवत, प्रा. न. र. फाटक, प्रा. सरदार प्रभृति विवेचक विद्वानांना आहे. माझ्यासारख्यानें तें काम अंगावर घेण्यांत स्वारस्य नाहीं. मात्र या ग्रंथांतल्या कालचित्रण करणाऱ्या विवेचनांतून लेखकाचा जो एक सूर निघत आहे तो माझ्यासारख्या हजारों लोकांना मुळींच पटणारा नाहीं असें आवर्जून नमूद करावेंसें वाटतें. आपणांला स्वातंत्र्य मिळालें आहे हें खरें. तें मिळविण्यांत टिळक–गांधींचा फार मोठा भाग होता याबद्दल कधींच दुमत होणार नाहीं. पण कुठलीहि गोष्ट मिळविण्यापेक्षा टिकविणें अधिक अवघड असतें. स्वातंत्र्य टिकविण्याला लागणारे अनेक गुण आज आपल्यांत फार कमी प्रमाणांत आढळत आहेत. रानडेगोखल्यांची राजकारण आणि अर्थकारण या क्षेत्रांतल्या शास्त्राभ्यासाची परंपरा महाराष्ट्रानें जोपासली असती, ज्योतिराव फुले व आगरकर यांनीं कानींकपाळीं ओरडून सांगितलेला सर्वस्पर्शी सामाजिक सुधारणेचा संदेश आम्ही आचरणांत आणण्याचा गेल्या दोन पिढ्यांनीं कसोशीनें प्रयत्न केला असता तर आजच्या राष्ट्रीय आणि सामाजिक जीवनांत पदोपदीं टोंचणारीं अनेक शल्यें निश्चित बोथटलीं असतीं. आपणांला स्वराज्य मिळालें हें खरें आहे. पण अजून आपणांला सुराज्य लाभायचें आहे, तें मिळवायचें आहे. शेंकडा नव्वद टक्के जनता आज अज्ञानाच्या आणि दारिद्र्याच्या कात्रींत सांपडून पशुतुल्य जीवन कंठीत आहे. माणसें असून मानवाच्या प्राथमिक हक्कांना मुकलेले हे कोट्यवधि जीव ज्या वेळीं खऱ्याखुऱ्या दृष्टीनें माणसांत येतील त्यावेळींच इंग्रजी अमदानींतल्या विचारवतांपैकीं कोण अधिक बरोबर होतें याचा निर्णय काळपुरुष देईल. तोंपर्यंत आम्हां सामान्य लोकांचें कर्तव्य एकच आहे. गेल्या साठ वर्षांतल्या इतिहासाकडे टिळक विरुद्ध गोखले, टिळक विरुद्ध आगरकर, दयानंद विरुद्ध चिपळूणकर, या दृष्टीनें पाहण्याची सवय आपण झडझडून दूर फेंकून दिली पाहिजे. हीं सारीं माणसें मोठीं होतीं यांत शंका नाहीं. पण तीं मोठीं असलीं तरी माणसें होतीं हें आपण विसरतां कामा नये. वर्तमानकाळ किंबहुना निकटचा भविष्यकाळ प्रत्येक व्यक्तीला नेहमी न्याय देऊं शकतोच असें नाहीं. अशा स्थितींत गेल्या दोनतीन पिढ्यांतल्या विविध मोठ्या माणसांनी जें कार्य केलें असेल त्याच्याकडे आपण सखोल ऐतिहासिक दृष्टीनें पाहूं या, त्या काळाचे शक्य तेवढे पूर्वग्रहविरहित टीकाकार होऊं या, आणि प्राचीन काळीं यज्ञकुंडांत ज्याप्रमाणे अग्नि जपून ठेवलेला असे त्याप्रमाणे या दीर्घ कालखंडानें स्फूर्तीचा, कर्तृत्वाचा, प्रेरकतेचा आणि मांगल्याचा जो जो स्फुलिंग आपल्यासाठीं राखून ठेवला असेल तो तो चेतवून भविष्यकाळ उजळविण्याचा प्रयत्न करूं.

( ले.— त्र्यं. र. देवगिरीकर, चित्रशाळा प्रकाशन, पुणें, २. मूल्य दहा रु. )

# — परीक्षणें —

कांहीं पावलें:— [ ना. श्री. दादासाहेब मावळंकर यांची रोजनिशी; संकलन व संपादन-श्री. भाऊ धर्माधिकारी; प्रकाशक गो. वा. कुळकर्णी, महाराष्ट्र ग्रंथ भांडार कोल्हापूर; मूल्य २॥ रु. ]

या दैनंदिनीचा कालावधि ता. २६-१२-१९२७ ते ७-९-१९२८ पर्यंतचा म्हणजे सुमारें ८ महिन्याचा आहे.

दैनंदिनी हें इतिहासचरित्रादिकांचें अत्यंत विश्वसनीय साधन होय. वास्तविक मनुष्य दैनंदिनी लिहितो ती 'स्वान्तः सुखाय'. परंतु पुढील इतिहासकारास ती किती आवश्यक भासते याची कल्पना ज्यांनी दैनंदिनी नियमितपणें लिहिली नाही अशा थोर पुरुषांच्या चरित्रकाराइतकी दुसऱ्या कोणास येणार नाही. असें महत्त्वाचें साधन निर्माण करून ठेवणें हा राष्ट्राचा इतिहास घडविणाऱ्या प्रत्येक माणसाची जबाबदारी होय.

इतिहासचरित्रादिकांचें साधन म्हणून दैनंदिनीचें महत्त्व सर्वमान्यच आहे. परंतु स्वतंत्र वाङ्मयप्रकारांत तिची गणना करतां येईल काय? पाश्चात्य वाङ्मयांतील सॅम्युएल पीप्स् ( Samuel Pepys ) याच्या दैनंदिनीचें एकच उदाहरण घेतलें तरी या प्रश्नाचें उत्तर सहज मिळण्यासारखें आहे. एका काळचे भारतमंत्री मॉंटेग्यूसाहेब यांचीहि दैनंदिनी सुप्रसिद्ध आहे. दैनंदिनी लिहिणाराने ज्या प्रमाणांत व जितक्या कौशल्याने आत्माविष्कार केला असेल त्यावर तिचें वाङ्मयीन मूल्य अवलंबून राहील. सॅम्युएल पीप्स् याच्या दैनंदिनींत तत्कालीन समाजाचें उत्कृष्ट चित्र पहावयास मिळतेंच परंतु त्यापेक्षाहि कठोर आत्मपरीक्षण हा तिचा रमणीय विशेष होय. त्याने आपली दैनंदिनी सांकेतिक लिपीमध्ये लिहिली होती असें म्हणतात. यामुळे सतराव्या शतकाच्या अखेरीअखेरीस लिहिलेली ही दैनंदिनी लेखकाच्या मृत्यूनंतर शेंसवाशें वर्षांनी जगापुढे आली. त्याने आपली दैनंदिनी 'स्वांतःसुखाय'च लिहिली असावी असें यावरून उघड दिसतें. अर्थात् यामुळेच तींतील आत्मपरीक्षण अत्यंत स्वच्छ व हृद्य झालें आहे.

रा. मावळंकर यांनी आपली दैनंदिनी अशाच आत्मपरीक्षणाच्या हेतूने लिहिली आहे असें त्यांनी पुस्तकास जोडलेल्या 'हृद्गता' वरून दिसतें. दैनंदिनीचा बराचसा भाग विलायतच्या प्रवासवर्णनाने व्यापिला आहे. त्यामुळे त्यांत दैनंदिनींत अपेक्षित असलेली आत्मपरता कमी प्रमाणांत आढळते. लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाचा खरा आविष्कार तादितर भागांत पहावयास मिळतो. दैनंदिनी लिहितांना मनुष्य जणू स्वतःशीं बोलत असतो. इंग्रजींत Thinking loudly म्हणतात तसा कांहीसा प्रकार त्याठिकाणीं घडत असतो. तेथे संकोचाला वाव नसतो. मनुष्याच्या व्यक्तिमत्त्वाचें सत्यदर्शन तेथे घडतें. यांतच दैनंदिनीचें महत्त्व साठविलेलें आहे. रा. मावळंकर यांच्या दैनंदिनींतील हा भाग लहान असला तरी त्यांत त्यांची तत्त्वनिष्ठा, न्यायी वृत्ति, स्वदेशाभिमान हे गुण, अनेक प्रसंगीं त्यांच्या मनांत उत्पन्न झालेला लढा, इत्यादिकांचें यथातथ्य दर्शन घडतें. त्यांत कृत्रिमपणाचा वास कोठेहि नाही. त्यामुळे हा सर्व भाग वाचनीय झाला आहे.

दैनंदिनी छापून प्रसिद्ध करावयाची म्हणजे तीवर थोडेतरी संस्कार करणें आवश्यक असतें, व तसें केल्याचें रा. मावळंकर यांनी मान्य केलें आहे. तरी मूळांतील सहजतेस बाध येऊं न देण्याची शक्य तितकी काळजी घेतली आहे. दैनंदिनीचा हा पहिला खंड आहे. या पुढील काळ सत्याग्रहाच्या लढ्याचा असल्यामुळे रा. मावळंकरांच्या व्यक्तिमत्त्वाच्या आणखी अज्ञात पैलूंचे वाचकांस दर्शन घडेल अशी आशा बाळगावयास जागा आहे. ग्रंथास रा. काका कालेलकर व श्री. धर्माधिकारी यांनी जोडलेल्या परिचयात्मक प्रस्तावना वाचनीय आहेत.

— (प्रा.) अ. म. जोशी

सालगुदस्तः—[ले० न. वि. गाडगीळ, प्रका०—देशमुख आणि कंपनी, शनिवार, पुणें, २. किं. रु.]

नामदार न. वि. उर्फ काकासाहेब गाडगीळ यांची वाङ्मयसेवा विविध क्षेत्रांतली आहे. विशेषतः अर्थशास्त्र, राजकारण व जीवनांतील बारीकसारीक अनुभव रेखाटतांना तिने आपली भावपूर्ण व्यापक सहानुभूति व विनोदगर्भ सुंदर भाषाशैली यांनी आपलें वैशिष्ट्य लोकांच्या नजरेला उत्कृष्टपणें आणलें आहे. याचें प्रत्यंतर त्याचा कांही दिवसांपूर्वी प्रसिद्ध झालेला 'सालगुदस्त' हा लेखसंग्रह वाचून पाहिला म्हणजे येतें. स्वातंत्र्यपूर्व राजकारणांत व राजकीय चळवळींत काकासाहेबांनी किती उत्कटतेने व साहसाने भाग घेतला, हें सर्व भारतीयांस विदित आहे. या धामधुमींत अनेक ठिकाणीं फिरत असतां, किंवा प्रसंगोपात्त तुरुंगांत असतां, त्यांच्या अनेकांशीं भेटी झाल्या, अनेक छोट्या मोठ्या प्रसंगांतून ते गेले. यांतूनच 'साल गुदस्त' या पुस्तकांतील वाङ्मय निर्माण झालें आहे.

साक्षात् जीवनांतून हें वाङ्मय निर्माण झाल्यामुळे, त्यांत सत्यकथेचा गोडवा व जिव्हाळा उत्पन्न झाला आहे. एका खेड्यांतील 'रामजीबुवांच्या' तोंडून 'ज्ञानू'च्या मोर्चोतील मृत्युसंबंधीं जें तत्त्वज्ञान त्यांनी ऐकलें तें त्यांचेंच काय, पण कोणाचेंहि अंतःकरण पिळवटून घेणारें आहे. 'डिक्सळच्या धुळींतील' अभूतपूर्व अनुभव 'अवंतिके'ला गेल्या-वर तेथे दिसलेलीं दृश्यें, आठवलेला इतिहास व भर्तृहरीला 'शतकत्रय' लिहिण्याची प्रेरणा देणाऱ्या गांवांतील 'शांभवी अड्डे, उपहार गृहें व नापिकगृहें' याचें दुर्दृश्य, त्यांचीं वर्णनें काकासाहेबांच्या भाषेंतून वाचतांना आपल्या मनाला अनेक हेलकावे बसतात. 'काँग्रेसची राजवट आली तर' या लेखांत समाजांतील यच्चयावत वर्गांतून नैतिक अधःपात झालेला काकासाहेबांना कसा दिसला व ती सर्व सृष्टि 'आदर्शाला सोडून कशी होती' याचें सुंदर दर्शन घडतें. त्याचप्रमाणे 'येरवड्याच्या तुरुंगांतील मुनीर', 'चलो यार लंडनने' यांतील 'अबोध उत्साह' उद्बोधक आहे. 'गोटीराम भय्या'सारख्या व्यावहारिक दृष्ट्या सामान्य दिसणाऱ्या माणसांत काकासाहेबांना असामान्यत्व कसें दिसलें व कां दिसलें याचें रहस्य त्यांच्या "माझ्या मंडई विद्यापीठाचा आद्य स्नातक आज 'सा विद्या या विमुक्तये' हें महान् तत्त्व आचरत आचरत दिवंगत झाला!" या शब्दांत सांठलेलें आढळतें. 'माणुसकीचा मान झाला नसतां' हा लेख म्हणजे प्रत्येकाला हरघडी येणारा प्रवासांतील अनुभव आहे. फक्त काकासाहेबांच्या वृत्तीमधील श्रेष्ठपणा व नम्रपणा प्रत्येकाजवळ नसतो इतकेंच. 'जुन्या बाजारांतील लोकशाही' या लेखांतील पुस्तकांचा इतिहास प्रत्येक रसिक वाचकाच्या घरीं घडत असून तो वाचीत असतां काकासाहेब आपलेंच हृद्गत व्यक्त करीत आहेत असें वाटतें. 'चित्रशाळे'संबंधी व्यक्त केलेलें पुण्यांतील एका उच्चवर्णीय मुलांचें अज्ञान हसू आणल्याखेरीज रहात

नाही. ' माझी पहिली व शेवटची चोरी ' यांतील प्रामाणिकपणा, ' भुलाभाई देसाई ' यांच्या व्यक्तिचित्रांतील निर्भिडपणा किंवा ' बाज-पाळणा ' या लेखांतील परिचित शब्दघोष व त्यामुळे उठलेले विचारतरंग हे सर्वच वाङ्मय अत्यंत हृद्य आहे.

काकासाहेबांची भाषाशैली सुंदर असून विनोदगर्भ आहे. तिच्यामधे विचारांचा सखोलपणा, जीवनदृष्टीचा अचूकपणा व वृत्तीचा प्रामाणिकपणा असून, त्यांचें चित्रण विनोदाच्या किरणांनी प्रकाशित झालेलें असतें. त्यांचें लिखाण वाचतांना आपण एखाद्या आंबराईमधून दिवसा वा रात्रीं चाललों असून झाडाच्या सावल्या व सूर्याचे वा चंद्राचे जाळीदार किरण आपल्या अंगावर मधूनमधून पडत आहेत, त्याने आपण सुखावत आहोंत व आपलीं पाउलें आंबराईपलीकडे असलेल्या ध्येयस्थानाच्या रोखाने पडत आहेत असें आपणांस वाटतें. अर्थशास्त्राची तर्ककर्कश चिकित्सा करणारा व राजकारणाची मार्मिक मीमांसा करणारा लेखक जीवनदृष्टीचें चित्रण करतांना प्रसंगीं किती हळूवार व भावपूर्ण होतो हें काकासाहेबांच्या ग्रंथवाचनाने प्रत्ययास येतें, व ही परंपरा ' गांधीजवाहराची ' आहे ही खूण पटते. काकासाहेबांनी आपल्या लिखाणाने मराठीला असचें संपन्न करावें.

— ( प्रा. ) शं. के. कानेटकर

" कडू आणि गोड " – [ ले. गंगाधर गाडगीळ, प्रका. विमल चित्रे, खारीबाव, बडोदें. किं. ३ रु. ]

" मानसचित्रें " या आपल्या पहिल्याच लघुकथासंग्रहाने गंगाधर गाडगीळांनी कथालेखकांत मोठ्या मानाचे स्थान मिळविलें. त्यांतील विविध हृदयांच्या मोहिनीने, संग्रहाच्या मुखपृष्ठावर चित्रित केलेल्या वाग्मग्न युवतीप्रमाणे, वाचकहि मंत्रमुग्ध झाला. त्यांच्या तन्मयतेने रेखाटलेल्या शिशुकथा हें त्या संग्रहाचें पहिलें आणि पहिल्याप्रतीचें आकर्षण ठरलें. विषय कोणताहि असला तरी त्याच्याशीं संबद्ध असलेल्या पात्रांचे मनोव्यापार दुरून पण अत्यंत सहानुभूतीने आणि तद्रूपतेने रंगवावेत गाडगीळांनीच असें वाटण्याइतका वाचकांचा विश्वास त्यांनीं पहिल्या सपाट्यांत संपादन केला.

आणि या कीर्तींत सर्वथैव भर घालील, असाच हा त्यांचा " कडू आणि गोड " संग्रह आहे. " कडू आणि गोड " ही या संग्रहांतील क्रमांकाने पहिलीच लघुकथा 'अभिरुची " ने लावलेल्या चढाओढींत पहिलें स्थान पटकावून बसली आहे हें कांही तिच्या यशस्वितेचें अंतिम गमक नव्हे. ती प्रसिद्ध होतांच चोहोंकडून जे सहजस्फूर्त प्रशंसोद्गार निघाले आणि आजहि तिचीं कित्येक घरांतून जीं एकाग्र पारायणें होत असतात, हेंच तिचें खरें आणि लोकमान्य प्रशस्तिपत्र आहे ! हरिभाऊकालीन हरिभाऊंच्याच सहजतेने व सौहार्दाने रंगवलेलें हें एकत्र कुटुंबाचें मार्मिक चित्र, गाडगीळांच्या खेळकर मोहक भाषाशैलीचें आणि निरोगी अधिकृत दृष्टिकोनाचें एकदमच दर्शन घडवितें. ' गिचामिड ', ' हृदय ', ' एकटा ' या गोष्टींत आढळून येणारें त्यांचें तत्त्वचिंतन ते प्रौढ वाटावेत इतकें परिपक्व वाटतें. उलट, ' शशीचें दुःख ' किंवा ' नावीन्य ' या कथा लिहित असत ते शशीच्या काल्पनिक आणि वास्तव अशा दोन्ही जगांशीं किती तपशिलवार समरस होऊं शकतात, हें अनुभवलें म्हणजे फार मौज वाटते ! चोरधव्यांच्या कथांतूनहि काही शिशुचित्रें आढळतात. तथापि बालमनाच्या संज्ञाप्रवाहांचें गाडगीळांचें आविष्करण हें सर्वस्वीं त्यांचेंच वैशिष्ट्य आहे.— किंबहुना आपल्या सर्वच पात्रांचें,— विशेषतः प्रमुख पात्रांचें,— मनोगाहन करून, त्यांच्या

ससंज्ञ-असंज्ञ मनांतील विविध प्रवाह मोठ्या कुशलतेने, प्रवाही आणि परिणामकारक चित्रण करणें, हेंच गाडगीळांचें अत्यंत यशस्वी असें तंत्र आहे. आपल्या कादंबरीलेखनात मर्ढेकरांनी या तंत्राचा प्रथम अवलंब केला. तथापि तें सहज, सुगम आणि सार्वत्रिक लोकप्रिय करण्याचें श्रेय गाडगीळांनाच द्यावें लागेल.

'किडलेलीं माणसें' 'क्षुल्लक गोष्ट' किंवा 'पावसाळी हवा' या कथांतून गाडगीळांच्या लेखनाचा आणखी एक तेजस्वी पैलू दृष्टीस पडतो. हीं सारीं कारकुनी पेशांतील व्यक्तिदर्शनें ! त्यात आकर्षक तें काय असायचें ? पण त्यांच्या क्षुद्र बाह्यांगाप्रमाणेंच असलेलें त्यांचें क्षुद्र अंतरंग, त्यांचा निलाजरा स्वार्थ, त्यांची कूपमंडूक वृत्ति, त्यांचें तें उंदरांच्यातल्या किड्यांसारखें बुजबुजलेलें जीवन, यःकश्चित् घटनांचा महाविचित्र परिणाम किंवा अगदी साध्या बारीक–सारीक गोष्टींनी वाटणारें आणि वाढणारें वैयक्तिक समाधान, यांचें मोठें रसाळ वर्णन या कथांतून ओसंडून वाहात आहे !

सर्वसामान्यपणें कोणतेंहि पात्र गाडगीळ अवास्तव दुष्ट किंवा पापी रंगवीत नाहीत. चाललेले संसार हे सुखाकरितांच चालले आहेत आणि अखेर ते कथांतील पात्रांच्या सुखाच्या कल्पनेप्रमाणें सुखाचेच होताहेत अशी चित्रें रंगवण्यांत श्री. गाडगीळांची लेखणी वाकबगार दिसते. (याला 'सलामी' हा एकच अपवाद म्हणावा लागेल.) त्यांनी कुणाची कुचेष्टा केली, कोणाचे दोष दाखवले तरी त्यांची स्वतःची त्या मागची वृत्ति ही सुसंस्कृत, समतोल आणि सात्विक राहिलेली आढळते ती यामुळेच असावी. सत्यकथा 'अभिरुची' वगैरे मासिकांतून त्यांच्या ज्या कथा या संग्रहानंतर प्रकाशित झालेल्या आहेत, त्यांवरून त्या कथांमागचें अंतःकरण अंतर्मुख आणि एकाकी असावें असा ग्रह होतो. अलीकडे ते स्त्रियांना अप्रबुद्ध ठरविणारीं काही सुंदर दृश्यें हंसत हंसत रेखाटतात. यांत आवर्ताचा दोष आढळला तरी त्याला शिष्टपणाचा किंवा पुरुषी शहाणपणाचा किंचितहि वास येत नाही.

श्री. गाडगीळांच्या शुद्ध, साध्या, बाळबोध वळणाच्या भाषाशैलीचा उल्लेख केल्याखेरीज या समीक्षणापुढे पूर्णविराम देतां यावयाचा नांही. आपल्या भाषेला ते कधीहि मुद्दाम नटवतांना दिसत नाहींत. त्यांच्या उपमा, त्यांचे दृष्टांत, हे अगदीं रोजच्या जीवनानुभवाचीं दृश्यें असतात. 'हृदय' या गोष्टीतील बँकेच्या मॅनेजरचें सर्व वर्णनच माझ्या या विधानाची साक्ष देईल. त्यातले एकच वाक्य उदाहरणार्थ पहा.—"पोस्टातून जितकीं पत्रें जात नसतील तितक्या लहान-सहान गोष्टी त्याच्या स्मरणात राहात" — "तिला पाहताच हया सान्द्रा विचारांनी त्यांच्या मनात गर्दी केली. सरबत शिंपडलेले बर्फाचे गोळे विकणाऱ्याची गाडी पाहिली म्हणजे छोटी मुलें भोंवती गर्दी करतात ना, तशी" (क्षुल्लक गोष्ट) अशा सर्वत्र विखुरलेल्या व्यावहारिक वाक्यातून एखादी कल्पना, "विद्युत्‌दीपानी उजळलेली मुंबई अंधारांतल्या ब्रोटाच्या आंगठीसारखी तळपत होती" (गिचमिड) अशी चमकून उठते,— पण ती एखादीच ! तथापि यावरून त्यांच्या लेखनशैलीला काव्याचें वावडें आहे, असें म्हणता येईल काय ? मला तसें वाटत नाही. काव्य केवळ रंगीबेरंगी गुलाबपुष्पाच्या दिमाखातच असतें, आणि तें पांढऱ्या स्वच्छ मोगऱ्याच्या सुगंधी साधेपणांत नसतें, असें थोडेंच आहे ?

—सु. जोशी.

अंधार—उजेड — लें. गोविंद केशव भट, प्रका. विमल चित्रे, खारीवाव, बडोदें. किंमत रुपये तीन. ]

"कडू आणि गोड" हा कथासंग्रह वाचून झाल्यावर गो. के. भट यांचा "अंधार-उजेड" हा लघुकथासंग्रह वाचावा लागणें, यांत भटांना जरा अन्यायच होण्याचा संभव आहे. कारण, त्याच्या कथांची प्रत्यक्ष तुलना नाहीं, तरी त्यांच्या लेखनासंबंधीं तुलनात्मक विचार मनांत येणे अगदीं अपरिहार्य आहे. दोन्हींहि संग्रहात विषयवैचित्र्य आहे, शिशुकथा म्हणून आहेत. आणि विवक्षित सामाजिक निरीक्षणाचाहि प्रयत्न आहे. पण या पलीकडे मात्र कोणत्याच बाबतींत या दोन्ही संग्रहांत साम्य आढळेल, असें वाटत नाहीं.

तथापि केवळ "प्रणय" कादंबरी आणि "गृहदाह" नाटक या पुस्तकांचे लेखक भट यांच्या कथा म्हणूनच या संग्रहाकडे पाहावयाचें म्हटलें तरीसुद्धां त्यांतील कथांच्या वाचनामुळें मनाला कलात्मक प्रसन्नता लाभत नाही. पहिलीच एक मजेदार गोष्ट मला जाणवली की, एक-दोन कथा वगळल्या तर बाकीच्या कथा वाचून संपवल्यावर त्यांची नांवेंच लक्ष्यांत राहत नाहीत! अर्थात् यामुळे कांही विशेष बिघडतें, असें नव्हे ; तथापि कथानकाची रचना आणि रंगत पुढे पुढे अशा कांहीं अवास्तव किंवा अतिरेकी होत जातात की आपण कशासंबंधीं काय वाचीत आहोंत, हें जाणून घेण्याकरितां पुन्हा पुन्हा मागे वळावें लागतें ! 'नाना असं कां करतात,' 'मी स्त्री आहें' 'यथापूर्वक' या कथानकांच्या वाचनांत हा अनुभव प्रकर्षानें येतो. श्री. भट कथावस्तूची निवड मोठ्या काळजीपूर्वक करितात आणि त्यांच्या पात्रांच्या स्वभावाविष्कारांत विविधताहि असते. तथापि कथानकाच्या ओघांत भटांच्याच बरोबर जात असतांना जी अनपेक्षित कलात्मक घटना घडावी अशी वाचक स्वभाविक इच्छा बाळगून असतो, ती भट कधीच पूर्ण करूं शकत नाहीत. अर्थात् अनपेक्षित कांही न घडतांहि गोष्टी साध्या सरळपणानेंहि मोठ्या आकर्षक होऊं शकतात, पण त्या तितक्याच परिणामकारक होण्याला लेखकाजवळ तसेंच भाषेचें प्रभुत्व आणि मानवी मनाचें खोल ज्ञान असावें लागतें. भटांच्या अंगों हे गुण असले तरी या कथांच्या मांडणींत ते तितके प्रत्ययास येत नाहींत. उदा०—त्यांची "अंधार—उजेड" हीच गोष्ट घ्या. त्यांत दगडू आपल्या मृत्युशय्येवरील पत्नीस चहा करून देण्याची भाषा बोलतो, त्यावेळीं, चहाला पैसा कुठला, या विचाराने तिच्या "मलूल चेहऱ्यावर चहाचें नांव काढल्यावर आश्चर्य उमटलं" (पा. १४८) पण दगडूने आपल्या "गुपिताच्या आनंदाच्या" भरांत तिला सांगितलें की, आज मला "लइ पैका मिळाला"—आणि खरोखरीच त्या दिवशीं त्याला नशीबाने हात दिलेला असतो.

या सर्व प्रकारांत कलात्मकतेला किंचितहि अवसर उरलेला नाहीं. सुतासारखी सरळ असलेली ही गोष्ट दगडूच्या पत्नीच्या मृत्यूने शोकान्त ठरत असली तरी तिच्या रसहीन शैलीमुळे वाचकाला त्याचें कांहीच सोयरसुतक वाटत नाही ! "अबोल रहिवासी" याचीहि हीच गत आहे, नेहमी आजारी आहे असें वाटावें इतकी किरकोळ शरीरयष्टि, गालाला खड्डे पडलेले, मोठे नाक खूप वर आलेलें आणि चेहरा अतिशय फिकट असा अबोल रहिवासी आपटे शाळेंत शिक्षक होता. तिसरीच्या वर्गातील एक सौदामिनी नांवाची अतिशय गोड मुलगी त्याच्याशींहि माना वेळावून मुरके मारून अंगाशीं लाडिवाळपणा करीत वागत असे. अशा गोष्टी इतर शिक्षकांना सांगत असतांना "लोक त्यावर हंसले. आपटे प्रथम संकोचला. पण मागून त्यालाहि बरें वाटलें." कारण सौदामिनीच्यामुळे त्याच्या पूर्वीच्या अबोल

उदास वृत्तींत फरक पडत चाललेला होता. पण " मिनी सिनेमांत गेली " हें ऐकून त्याला आपल्या शरीराचा एखादा भाग मूल न देतां कापून काढावा, अशा वेदना होतात आणि तो तें गाव सोडतो ! कथानकाच्या ओघांत मध्यंतरी मिनीकडे आपटे सत्यनारायणाला गेला असतांना, एक मध्यमवयीन, सुरेख, नटलेली बाई दिवाणखान्यांत येऊन आपटेकडे पाहून स्मित करते, त्यावेळीं आपटे एकटाच असतो.— या घटनेचा भटांनी कथानकाकरिता कांहींच उपयोग करून घेतलेला दिसत नाही. मग कथा हृद्य कशी व्हावी ?

हाच दोष " सरदार " या गोष्टींत ठसठशीतपणें नजरेंत भरतो. सरदारांचा " डोळ्यांतला वारा करारीपणा " भटानी वेळोवेळीं उल्लेखिलेला आहे. पण या गुणाची आणि कथावस्तूची कलात्मक सांगड मात्र घातली गेलेली नाहीं.

" तुळशीचें लग्न " ही गोष्ट शेवटचे 'न सुटणारा प्रश्न' हे तीन शब्द वगळले तर शिशुकथा म्हणून बरी वठली आहे. तसेंच, " नाना असें कां करतात " या कथेंतील 'बंड्या' चें चित्रणहि छान आहे. " ते मुंबईला येतात " या कथेंत विनोदाला भरपूर वाव आहे आणि थोड्याशा प्रमाणांत तो यशस्वीहि झाला आहे, असें म्हणायला हरकत नाही.

असें असलें तरी एकंदरींत या साऱ्या कथा रुक्षच वाटतात. यांचें मुख्य कारण आपण गोष्ट सांगत आहोंत याची भटांना सतत जाणीव असलेली दिसते. त्यामुळे ते स्वतःच पुढे येऊन एकामागून एक वाक्यें सांगत सुटतात. कथानकांतील घटना या आपोआप साकार होत आहेत असा वाचकाला प्रत्यय येत नाही. आणि त्यांत भर म्हणूनच की काय भाषेकडेहि द्यावें तितकें ते लक्ष देत नाहीत. उदा०— " त्यावरून त्यांच्या जीवनात जो शोकांत भरलेला होता—————" "———पण आडवं येऊन मूल आणि त्याची आई दोन्हीहि कामास आली " ( मोरया ) " हेलकऱ्याच्या जातीला ती जशी फार लहानगी तशी ती त्या मानानं उजळहि होती " ( अंधार–उजेड )

—सु. जोशी

**माणदेशी माणसंः**—[ ले. श्री. व्यंकटेश माडगूळकर, प्रका. वा. वि. भट. अभिनव प्रकाशन. मुंबई १४. किंमत ३ रु. ]

'मौज' साप्ताहिकांतून क्रमशः अवतीर्ण झालेली माणदेशी माणसं आतां पुस्तकरूपाने वाचकांच्या भेटीस आलीं आहेत. ह्यांत एकूण पंधरा व्यक्तिरेखा असून त्यांत इनामदार, मास्तर, कारकून, महार, रामोशी, दरवेशी इत्यादि विविध पात्रें आहेत.

सदर व्यक्तिरेखा वाचतांना मनांवर प्रमुख परीणाम होतो तो म्हणजे लेखणीचा कसदारपणा व जीवंतपणा. कुठेहि कृत्रिमपणा व भडकपणा जाणवत नाही. प्रत्येक पात्र प्रामाणिकपणें व योग्य रंग घेऊनच रेखाटलें आहे. लेखक ह्या सर्व व्यक्तींबरोबर वावरलेला आहे. त्यांचें आयुष्य, त्याचे संसार, सुखदुःखें त्याने समरस होऊन पाहिलीं आहेत. आणि जें पाहिलें व जाणवलें तें अत्यंत सहानुभूतीनें व आपलेपणाने, सडेतोडपणें व कलात्मकतेने वाचकापुढे ठेवलेले आहे. भरपूर जिव्हाळा असूनहि दुबळेपणा नाही. व्यक्तींचीं नुसती वर्णनें असलीं तरी सामाजिक सत्याची पार्श्वभूमी सुटलेली नाही. म्हणूनच अनुभूतीने ओतप्रोत भरलेल्या ह्या कथा वाचतांना कुठल्याहि रुचीचा वाचक पूर्णपणें समरस होतो.

म. सा. प. ( २२-३-४ )

आयुष्याच्या उतरणीला लागलेल्या धर्मा रामोशाचा सताड संसार डोळ्यापुढून हालत नाही. इतकंच नव्हे तर धर्माच्या धर्मपत्नीचं न रंगवलेलं रूपहि मनांत रुतून राहतं. अवखळ झेल्याच्या रूपाने खेड्यांतल्या विद्यार्थ्यांचा प्रश्न डोळ्यापुढे येतो. तसाच नामा मास्तरच्या उदाहरणावरून शिक्षकांच्या पेशाबद्दल डोक्यांत विचार घोळ घालतात. रामा मैलकुलीला पडलेलें कोडें मन अस्वस्थ करतें. शिवा माळ्याची लाचारी व त्यापायीं घडलेली चोरी आणि कोंडिबा गायकवाडची राक्षसी वागणूक व त्यामुळे झालेला खून दोन्ही समाज रचनेवर, माणसाच्या मनोरचनेवर, सारखाच विदारक प्रकाश पाडतात. उठवळ गोकुळांचे जगावेगळं वागणं जितकें मनोवेधक आहे तितकं जगांत येऊं पाहणाऱ्या विद्ध झालेल्या विधवा कमळीचेंहि. सर्वांत शिदा चांभाराची कहाणी उत्कृष्ट वाटते. त्याच्या बोलींत व चालींत मानवी मनाच्या साऱ्या सूक्ष्म वृत्ति वस्ती करून राहिल्या आहेत. उद्धट शिदा, अगतिक शिवा, खंगलेला धर्मा, काळपुरूष कोंडीबा, दिलदार इनामदार, प्रवाहपतित रघू, गांवभवानी गोकुळा, काडवी खाला सारं संपूर्ण विश्व आहे ! त्यांत सर्व सुष्ट दुष्ट प्रवृत्ति आहेत, सर्व कालचे उद्यांचे प्रश्न आहेत......

खेड्यातल्या शाळेचें वर्णन, अस्पृष्टाशी वागण्याची तऱ्हा, महारांचे तमाशा-प्रेम, ब्राह्मण, कुणबी, महार ह्यांचे कायमचे व लुटीसारख्या प्रसंगीं प्रकटलेले संबंध, ग्रामीण स्त्रीचे समाजातलें स्थान—साराच तपशील उत्कृष्ट वाटतो. त्याला साजेशीच भाषाशैली आहे, ओघवती, अकृत्रिम अन् आवेशपूर्ण !

सर्व व्यक्तिरेखा एकाच पद्धतीने लिहिल्या आहेत हा एक मोठा दोष पुस्तकांत वाटतो. व्यक्तींची वर्णने करायची तऱ्हाहि तीच तीच वाटते. सर्वजण धोतरा लुगड्याचा सोगा उचलून चित्याच्या चालीने जात असतात. नामा मास्तर व गणा महार एकच वाटतात. झेल्या व वकस ह्यांच्या कहाणींतल्या अखेरच्या आविष्करणांत साधर्म्य वाटतें.

रसरशीत व राकट व्यक्तिचित्रें, ग्रामीण जीवानच्या सर्वांगावर सारखा प्रकाश पाडणाऱ्या कथा एवढेंच लेखकाचें यश नाही. ग्रामीण चित्रें रंगवतांना आजवर अनेक मान्यवर लेखकांना उसन्या कल्पकतेची व घातुक कृत्रिमतेची रंगोटी करण्याचा मोह पडला. श्री. माडगूळकर त्यापासून अलिप्त आहेत. ग्रामीण जीवन त्यांनी नुसतें जवळून पाहिलें नसून त्यांत जगून त्यांना मानवी मनाच्या अनेक आकृतींचा अंदाज आला आहे, तेथील समाजातल्या अनेक समस्यांचा शोध लागला आहे. माडगूळकरांच्या ह्या व असल्या कथांमुळे आजवर लिहिली जात असलेली ग्रामीण विषयक बेगडी चित्रें ह्यापुढे नाहीशी होतील अशी आशा वाटते. हे श्री. माडगूळकरांचें यश, तसेंच मराठी वाङ्मयाचेंहि महाभाग्य !

—अरविंद गोखले.

**नाट्यपरामर्श**—[ ले० व प्रका० शिल्पकार र. कृ. फडके; १०९ विजयनगर, दादर, मुंबई नं. १४ ].

सुप्रसिद्ध शिल्पकार फडके यांनी प्रस्तुत ग्रंथांत यापूर्वी रत्नाकरादि मासिकांत प्रसिद्ध केलेल्या आपल्या नाट्यविषयक लेखांचा संग्रह करून रसिकांना व अभ्यासकांना उपकृत करून ठेविलें आहे. प्रसिद्धीकालींच गाजलेल्या या लेखांना ग्रंथनिविष्ट करण्याची खरोखरच आवश्यकता होती. मराठी नाट्यसृष्टींतील खाडिलकर, कोल्हटकर, गडकरी इत्यादि जीं बडींबडीं धेंडें, त्यांच्या नाटकांवर अत्यंत प्रखर परंतु सर्वस्वी योग्य, न्याय्य व निर्मत्सर

अशी टीका या लेखांत आली आहे. आडवें आलें म्हणजे कापावें लागतें या म्हणी-प्रमाणे, नाट्यप्रगतीच्या आड येणाऱ्या, चुकीचे नाट्यादर्श प्रेक्षकांसमोर व नवोदित नाटककारांसमोर ठेवणाऱ्या नाटकांचा कोणत्याहि प्रकारें मुलाहिजा न ठेवतां त्यांनी अगदीं धुव्वा उडविला आहे. उत्तेजनपर टीकेची उद्योन्मुख नाटककारांना जशी जरूरी असते, तशीच न्याय्य व विदारक टीकेची सुप्रतिष्ठित नाटककारांना जरूरी असते. टीकेचे हे दोन प्रकार म्हणतां येतील. मराठी साहित्याच्या दुर्दैवाने उत्तेजनपर नव्हे तर स्तुतिपर, फाजील स्तुतिपर टीका किंवा अभिप्राय मोठ्या प्रमाणावर दिले जातात. अभिप्राय लेखकांनी व टीकाकारांनी पुस्तकें अथपासून इतिपर्यंत न वाचल्याचा हा उघड उघड पुरावा असतो. असल्या "गुडीगुडी" अभिप्रायांनीं मूळ लेखकांना बरें वाटत असलें, तरी आदर्शसाहित्याची त्यामुळे हानि होते. कोल्हटकर, खाडिलकर, गडकरी यांच्या नाटकांच्या बाबतींत असेंच झालें. गुळचट व खुळचट अभिप्रायांमुळे आपण जें लिहूं तें खपतें अशी भावना त्यांची होऊन, नाट्यकलेच्या दृष्टीने त्यांनी अगदीं पुंडावा आरंभिला. स्वसामर्थ्याचा नीट उपयोग न करणाऱ्या या नाटककारांनी कथानकाची निवड, प्रवेशांची सयुक्तिक मांडणी, कथानकाचा वास्तवतापूर्ण विस्तार, स्वभावरेखनांतील सुसंबद्धता, भाषेची स्वाभाविकता इत्यादि नाटकाला अत्यावश्यक गोष्टींचा उघड उघड उपमर्द केला, खाडिलकरांनी पौराणिक कथानकात अक्षम्य बदल करून दशरथादि पौराणिक पात्रें हास्यास्पद बनविलीं. कोल्हटकरानी अद्भुतरम्यतेच्या नादीं लागून वास्तवता डावलली. गडकऱ्यांनी शब्दांच्या भुलभुलावणीने अवास्तव किंवा अतिरिक्त भावनात्मक स्वभावरेखन केलें. या गोष्टी वाईट असून "गुडीगुडी" अभिप्राय लेखकांनीं व नाटककारांच्या अंधभक्तांनी त्या वाईट आहेत असें सांगण्याचें धारिष्ट्य केलें नाही. नुसता गौरव करण्याचें धोरण ठेविलें. त्यामुळे नाट्यकलेला आपण किती खोलांत नेऊन ढकलीत आहोंत याची त्यांनी पर्वा केली नाही. या लोकांच्या डोळ्यांत अंजन घालण्याची अवश्यकता होती. शिल्पकार फडके यांच्यासारख्या निस्पृह, रसिक, मुरब्बी, कलाभिज्ञ टीकाकाराने ही कामगिरी उत्तम प्रकारें बजाविली.

शिल्पकार फडके यांनी नाट्यपरामर्षाच्या ज्या कसोटया ठरविल्या आहेत त्या विश्वमान्य अशाच आहेत. औचित्य हा कलेचा आत्मा होय. अनौचित्य हें रसभंगाचें प्रमुख कारण होय. किर्लोस्कर व देवलांच्यानंतर हें औचित्याचें प्रमाण कमी कमी होत चाललें व भोंगळपणा वाढत चालला. शिल्पकार फडके यांनी ज्यांच्यावर शरसंधान केलें आहे त्यांच्या नाटकांत हा भोंगळपणा सर्वांत अधिक आढळतो. तो नाहींसा करण्याकरितां प्रेक्षक व टीकाकार यांनी जागरूक राहिलें पाहिजे असें श्री. फडके यांचें म्हणणें दिसतें व तें योग्यच आहे. सवतीमत्सर, वधूपरीक्षा, सोन्याचा कळस, स्त्रीपुरुष, एकच प्याला, पुण्यप्रभाव इत्यादि नाटकांवर प्रस्तुत ग्रंथांत जी टीका आली आहे ती प्रखर असली तरी साधार व सकारण आहे. ही टीका करीत असतांना टीकाकाराने उच्च भूमिका स्वीकारली असून, कोठेंहि मनाचा तोल सुटूं दिलेला नाही. 'नामधारी लेखक' या मथळ्याखाली प्रसिद्ध झालेला लेख या म्हणण्याची सत्यता पटवील. आदर्श नाटकें अमुक अमुक पद्धतीने लिहिलीं जातात; कोल्हटकरादि श्रेष्ठ समजल्या जाणाऱ्या नाटककारांनीहि आदर्श पद्धतीने आपलीं नाटकें लिहिलीं नाहीत; सबब कडक टीका करून हे नाट्यादर्श लोकांसमोर ठेवण्याची वेळ आली आहे, अशा समजुतीने व शुद्ध बुद्धीने श्री. फडके यांनी

अनुक्रमणिका

आपले लेख लिहिले आहेत. टीकेच्या ओघांत नाट्यकलेचीं म्हणून जीं सनातन तत्त्वें त्यांनी प्रतिपादिलीं आहेत तीं निरपवाद असून, त्यांचें विवेचन मोठें आकर्षक झालें आहे. हें सर्व विवेचन उपरोध, उपहास, व्याजस्तुति इत्यादि गुणांनी मंडित असल्याने सर्वत्र लेख मोठे चटकदार, मार्मिक व मर्मभेदक बनले आहेत. शिल्पकार फडके यांच्या विनोदाची तऱ्हा अगदी न्यारी व बहारीची आहे. आपली टीका कोठेहि वैयक्तिक न बनवितां, तिला सतत 'विषयनिष्ठ' ठेविल्याबद्दल लेखकाला धन्यवाद दिले पाहिजेत. प्रस्तुत संग्रहातील सर्वच लेख प्रखर टीकात्मक नाहीत. "नमुनेदार नाटिका" हा संशयकल्लोळ नाटकावरील लेख नाट्यपरामर्षकार चांगल्या नाटकाचें सौंदर्यसमीक्षण किती गोडव्याने करूं शकतात तें दाखवितो. सुसंबद्ध स्वभावरेखन कसें असावें, प्रसंगांची स्वाभाविक मांडणी कशी करावी, घरगुती लयबद्ध भाषा कशी योजावी हें ज्यांना पाहावयाचें असेल त्यांनी हा लेख अवश्य वाचावा. मराठी नाटक किर्लोस्कर-देवलांचा मागोवा घेत आणि कालिदास–शेक्सपीयर–इब्सेनादि पौरस्त्य व पाश्चिमात्य नाटककारांना वाट पुसत जर गेलें असतें तर त्याची झाली आहे त्यापेक्षाहि अभिनंदनीय प्रगति झाली असती यांत शंका नाही. अद्भुतरम्यता आणि संगीत यांच्या फाजील नादीं लागल्याने नाटककारांनी नाटकाच्या इतर आवश्यक अंगांकडे दुर्लक्ष केलें. तानांच्या मेंडोळ्यांवर प्रेक्षक खूप होत असल्यावर, स्वभावरेखनाच्या सुसंगतीकडे नाटककार लक्ष देतात कशाला ! अशा अनेक गोष्टींचा परामर्ष येथे घेतलेला आढळेल. कलेचा उच्च आदर्श दाखविणारे, त्या आदर्शांच्या आड येणाऱ्या गोष्टींवर न्यायनिष्ठुर पण विनोदी पद्धतीने प्रहार करणारे, प्रस्तुत संग्रहातील लेख म्हणजे मराठी टीकावाङ्मयाचें श्रेष्ठ प्रकारचें लेणेंच होय.

—( प्रा. ) डॉ. वि. पां. दांडेकर

**नवात्मिका**—[ एक अंकी नाटिका; लेखक— शामराव निळकण्ठ ओक. प्रकाशक के. भि. ढवळे, श्रीसमर्थसदन, गिरगांव, मुंबई ४. पृष्ठें १४२; मूल्य तीन रु. ]

ह्या नवलाईच्या ? नऊ नाटिका विनोदी लेखक शामराव ओक यांच्या तिखट आणि चावट (√चाव) लेखणींतून उतरलेल्या आहेत हें सांगितल्यावर त्यांतील गुणावगुणांची वेगळी चर्चा करण्याचें कारण फारसें उरत नाही. या नवांपैकी पांच रुपान्तरात्मक असून चार विटंबना किंवा उपरोधी टीकाभूत आहेत. ह्या रूपान्तरांची बहुसंख्या पाहून आपले वाचक दुःखाने किंवा कुचेष्टेने काय म्हणतील त्याचा आगाऊ अंदाज लेखकाने प्रास्ताविक खुलाशांत केला आहे तरी तेवढ्याने वाचकवर्ग तृप्त होणार नाही.

स्वतंत्र नाटिकांपैकी 'कुलवर' ही प्रथम देण्यात आली आहे. मुंबई नभोवाणीवरून ही अनेक वेळा प्रसृत झाली आहे. रांगणेकरांच्या 'कुलवधू'च्या कथानकाचें हें चतुर विडंबन आहे पण केवळ नायकांच्या पात्रांऐवजीं पुरुषपात्रांची आणि उलट योजना की झालें विडंबन असें नसून स्वतंत्र कथाभाग कलावंत घराण्यास साजेशा वातावरणांत निर्माण केला आहे. अंधारांतील संवाद या प्रकरणांत तो आणि ती यांचीं प्रत्यक्ष भाषणें, त्याच वेळीं त्यांच्या अंतर्मनांचीं आणि 'आणखी अंतर्मनांची' होणारीं भाषणें देऊन मर्ढेकरांच्या संज्ञाप्रवाह पद्धतीची टिंगल केली आहे. मानापमान--पुरवणी अंकांत 'शौर्य श्रेष्ठ की धन श्रेष्ठ ?' या प्रश्नाच्या नाटककर्त्यांच्या उत्तराला उलटविलें आहे आणि धैर्यधराला लक्ष्मीधराचे पाय धरायल

लावले आहेत. चालू परिस्थितीवर ही यशस्वी विदारक टीका आहे. क्षणभर मराठीकरण या नाटिकेंत भाषेच्या शुद्धीकरणाची टिंगल आहे. या नाटिकेंत लांबण फार आणि चटकदार-पणा कमी वाटतो.

बाकीचीं रूपांतरें आहेत. त्यांपैकी 'श्रीमंतांचा दुपेटा' शामरावी पद्धतीच्या टिंगलखोर हास्यरसानें ओथंबला आहे. 'एकले जीव' मधील भावनाचित्र हृदयंगम आहे. 'खुनानंतर' चें कथानक गमतीदार पण विलायती घटनेचें उघड दिसतें. आपल्या देशांत इतके सुसंस्कृत चोर अद्याप निर्माण व्हावयाचे आहेत. 'मानवी' वेदकालीन पार्श्वभूमीवर रचिली असून तींत स्त्रीहृदयाचें काठिन्य मर्यादित असतें असें प्रतिपादिलें आहे. 'विवाहाचा वायदा' कंटाळवाणा वाटला. आपल्या प्रतिभेच्या प्रकृतीशीं संवादी कथा निवडण्यांत शामरावांचें कौशल्य दिसतें.

रा. शामरावांचें विशेष कौशल्य त्यांच्या विडंबनात्मक अनुकरणांत दिसतें; त्यांनी लिहि-लेल्या संवादांत चटकदारपणा आढळतो. दोषाविष्करणांत त्यांचा हातखंडा आहे. स्वतंत्र रचना आणि रूपांतरें यांची सळमेसळ एकाच संग्रहांत न करितां त्यांचीं वेगळालीं पुस्तकें करावीं म्हणजे स्वतंत्र रचनांचें महत्त्व कायम राहील. वर्ग एकचा माल व वर्ग दोनचा माल यांची मिसळ केल्यास सर्वच मालाला दुसरा वर्ग मिळतो.

—चिं. वि. जोशी

## नागरिकशास्त्र —

१. शिक्षकांचें नागरिकशास्त्रः— [ ले० प्रा. वि. पां. वोकील, प्रका. टीचर्स पब्लिशिंग हाऊस, ५०४ सदाशिव पेठ, पुणें २. किं. २॥ रुपये. ]

**२. नागरनीतिः**— [ले. प्रो. एस्. एम्. कुलकर्णी, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणें २. किं. ४ रुपये. ]

हीं दोन पुस्तकें नागरिकशास्त्राचें विवेचन करणारीं आहेत. सध्यां शाळाखात्याने प्राथमिक शिक्षणांत नागरिकशास्त्राचा समावेश केला असल्याने शिक्षकांना या विषयाची माहिती करून देणारीं पुस्तकें, विद्यार्थ्यांना द्यावयाच्या पुस्तकी धड्यांबरोबरच तयार होत आहेत.

प्रा. वोकील हे मुंबईच्या सेकंडरी ट्रेनिंग कॉलेजमध्ये कांहीं वर्षे शिक्षक होते व पुढें ते मध्यभागाचे एज्युकेशनल इन्स्पेक्टर झाले. यामुळे त्यांचें अध्ययन आणि अवलोकन बरेंच खोल झालें असून त्याची प्रचीति त्यांच्या या ग्रंथांत दिसून येते. त्यांनी हा विषय मुळींच रुक्ष, शास्त्रीय जड स्वरूपाचा होऊं दिला नाही. तसेंच आपल्या जुन्या ग्रंथांतील जाग-जागीं उतारे देऊन विवेचन साधार केलें आहे. शेवटीं शिक्षकांना उपयोगी असा अभ्यास-क्रमहि दिला आहे. हें शेवटचें प्रकरण काढून टाकल्यास हें पुस्तक सर्वच नागरिकांस वाच-नीय होईल म्हणून तसें करून 'आपलें नागरिकशास्त्र' ही आवृत्तिहि त्यांनी या पुस्तका-बरोबरच काढली आहे.

नागरिकांच्या जीवनाचे कौटुंबिक, सामाजिक, स्थानिक, आर्थिक, राजकीय, सांस्कृतिक, व धार्मिक असे विभाग पाडून, हें विविधांगी जीवन कसें चांगल्या प्रकारें व्यतीत करावें, याचें सोपपत्तिक विवेचन ग्रंथकर्त्यानें दिलें आहे, तें मननीय आहे. कांही जागीं

ग्रंथकर्त्याशीं, त्याने दिलेल्या आचारपाठांत व विचाराच्या पठडींत विचारी वाचकांचा मतभेद होईल हें खरें. प्रा. बोकिलांनी आर्यसंस्कृतीला धरून विषयाची मांडणी केली असल्यामुळें नवमतवाद्यांना साहजिकच ती पुराणमतवादी म्हणून उपेक्षणीय वाटणार.

" आर्थिक बाबतींत बायकांना पूर्णपणें स्वातंत्र्य देणें हें त्यांनाच घातुक ठरेल. घरांतल्या घरात स्त्रीचा जो आज दर्जा आहे, तो तिला योग्य आहे. समाजांत समंजस माणसें स्त्रियांना जरूर तो मान देतातच. स्वातंत्र्य म्हणजे सदाचारास पूर्ण मोकळीक असा ' स्वातंत्र्य ' याचा खरा अर्थ आहे. आणि त्या दृष्टीने आजहि घरांत व समाजांत जरूर तें स्वातंत्र्य आहे. मग अधिक तें काय पाहिजे ? " ( पृ. ५२ )

हा निषेधात्मक प्रश्न ' सफ्रेजिस्ट ' घडणीच्या माणसांना कितपत रुचेल !

प्रा. कुलकर्णी यांची ' नागर नीति ' सिद्धान्तमय वाटते. एखादें पाश्चात्य शास्त्र घेऊन तें जसेंच्या तसें स्वभाषेंत उतरावें तसें यांत झालेलें दिसतें. आपल्या समाजातील उदाहरणें घेऊन हें शास्त्र जास्त सुबोध करतां आलें असतें. ' संस्था, परंपरा व चालरीती ' या प्रकरणांत फार भेसळ झाली आहे. National Planning Committee च्या पुस्तकातले उद्योगांचे जे सविस्तर प्रकार दिले आहेत, ते संस्था ( Association ) या सामाजिक अर्थाने विवेचण्याच्या विषयांत विषयांतरासारखें वाटतात. तसेंच कुटुंबसंस्था हें प्रकरण दिल्यानंतर विवाह पद्धतीचें स्वतंत्र प्रकरण नको होतें. नागरिकशास्त्र ( Civics ) आणि समाजशास्त्र ( Sociology ) यांचें सर्वेलोटें असतें खरें, तथापि प्रस्तुत पुस्तक स्वतंत्र नागरिक नीतीचें आहे हें विसरून चालावयाचें नाही.

आपलें रूपांतरित लेखन स्पष्ट समजण्यासाठी परिभाषा जी मुद्दाम शेवटीं दिली आहे ती पुस्तकाला उपयुक्तच वाटेल. कांहीं परिभाषा रूढ न घेतां कांही नवीनच जी बनविली आहे ती बरोबर वाटत नाही. उदा० Exogamous बाह्यसंबंधी—यांत गोत्रांतर विवाहाचा अर्थ येत नाही. तोच अर्थ या संज्ञेने अभिप्रेत असतो. Monogamy ' एकपतिकत्व ' — याचा वास्तविक अर्थ एका वेळीं एक पत्नी किंवा पति असणें, असा आहे. पण अनेकपति करण्याची सुधारलेल्या समाजांत चाल नसल्यानें या संज्ञेला प्रतिशब्द ' एकपत्नीत्व ' असा रूढ झाला आहे. Polygamy ला ' अनेकपत्नीकत्व ' ही संज्ञा दिली ती योग्यच आहे. तेथे बहुपतिकत्वाला Polygamy ही वेगळी इंग्रजी संज्ञा आहे. Aristocracy, Autocracy व Democracy यांना प्रतिशब्द अनुक्रमें 'वर्गतंत्र', 'एकतंत्र' व ' लोकतंत्र ' असे जे दिले आहेत त्यांत ' तंत्र ' मागे ' राज्य ' शब्द घेता तर यथार्थ झालें असतें. ही शासनविषयक परिभाषा आहे, व तंत्राला बहुविध अर्थ आहेत. असो.

कदाचित् हें पुस्तक प्राथमिक शिक्षकांसाठी ( प्रा. बोकिलांच्याप्रमाणे ) लिहिलें नसेल तर मराठींत Civics वर तात्त्विक ग्रंथ अनुवादावा या हेतूनें याची रचना झाली असेल. दोन पुस्तकें एकदम पुढे आलीं म्हणून तरतमभाव उद्भवला इतकेंच. एरवीं मराठी शास्त्रीय ग्रंथांत ' नागरनीती 'ने चांगली भर टाकली आहे, यांत शंकाच नाही.

ग्रंथवेष्टनावरच्या दलालींचित्राचा खुलासा कोठे दिला असता तर आधुनिक चित्रकलानभिज्ञ वाचकांना त्याचें कोडें उलगडलें असतें व आनंदाचाहि लाभ होता

—चिं. ग. कर्वे

**मराठी दोला मुद्रितें:—** [ प्रकाशक महाराष्ट्र ग्रंथभांडार लि. गिरगांव, मुंबई, मूल्य १ रु. ]

' मराठी दोलामुद्रितें ' म्हणजे १८६७ पर्यंत मराठी मार्फत प्रसिद्ध झालेल्या शिळाछाप आणि खिळाछाप पुस्तकांपैकी जितकीं मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आजमितीला अस्तित्वांत आहेत तितक्या पुस्तकांची विशेष तपशीलाने दिलेली यादी आहे. पुस्तकात सात आर्टपेपरवरील आणि तीन साधे ब्लॉक्स ( ग्रंथसंग्रहांत नसलेल्या पुस्तकांसंबंधी ) तत्कालीन छपाओीचे नमुने दर्शविण्यासाठी घातले असून शेवटीं पुस्तकांच्या विषयांवर, मुद्रणस्थलवार, ग्रंथकारनामवार तीन सूच्या किंवा 'दर्शिका' परिशिष्ट-रूपाने जोडलेल्या आहेत. यावरून पुस्तकाची रचना शक्य तितकी काळजीपूर्वक केल्याचें उघड दिसतें. तथापि मुहूर्त साधण्याच्या घाओींत आर्टपेपरवरील चित्रांचा यादींतील ग्रंथाशीं संबंध व्यक्त करणारा यादींतील क्रमांक त्या त्या चित्राबरोबरच छापण्दाचा राहून गेल्याने आर्टपेपर पृ. ८ वरील शिलामुद्रित कोणत्या ग्रंथांतील आहे याचा स्पष्ट बोध होत नाही. प्रत्यक्ष यादींत कांही ठिकाणचा तपशील निदान ' मोडी ' ' बालबोध ' अित्यादि द्यावयाचा राहिला असावा अशी शंका येते. आणि अेवढ्या प्रयत्नाने तयार केलेल्या या यादींत कांही क्रमांकांबद्दल आणखी थोडा तपशील देअून आठदहा पृष्ठें वाढविलीं असतीं तर कदाचित् बरें झालें असतें असेंहि वाटतें. परंतु या किरकोळ चुका आहेत. त्यांमुळे अशा तऱ्हेचा हा मराठींतलि पहिलाच आघाडीचा प्रयत्न आहे हें त्याचें श्रेय कोणालाच काढून घेतां येणार नाही.

ग्रंथप्रेमी आणि प्राचीन ग्रंथांचे संग्राहक आणि शिकारी यांना या पुस्तकाचें महत्त्व विशेष वाटेल आणि ते श्री. प्रियोळकरांच्या प्रस्तावनेबद्दल त्यांना निश्चित धन्यवाद देतील. मराठी ग्रंथसंग्रहांतील पुस्तकांच्या याद्यांचा अितिहास सांगतां सांगतां त्यांनी क्रमपुस्तक ( कॅटॅलॉग ) म्हणजे काय, दुर्मिळ पुस्तक कशाला म्हणावें, दोलामुद्रितें म्हणजे काय यांचें जें तात्त्विक विवेचन केलें आहे त्याच्याशीं आमचे बहुतांशीं सहमत आहे. आणि त्याच वेळीं मराठी पुस्तकांच्या सहकारी प्रयत्नांनी झालेल्या याद्यांतील चुका आणि तीं पुस्तकें सुरक्षित ठेवण्याची झालेली परवड यांची जी साधार आणि कारुण्यपूर्ण माहिती त्यानी दिली आहे, तिची अन्य स्थळावरून पुनरुक्ति झालेली दिसली तथापि ती अनाठायीं आहे असें कोणीहि म्हणणार नाही.

ग्रंथांच्या या यादीप्रमाणे सवर्णन याद्या निर्माण करणें हें आपल्या वाङ्मयेतिहासाच्याच केवळ नव्हे तर ग्रंथालय शास्त्राच्या, ग्रंथनिर्मितीच्या, मुद्रणकलेच्या, आणि ज्ञान प्रसाराच्या प्रगतीच्या अितिहासाच्या दृष्टीनेहि अत्यंत महत्त्वाचें आहे. परंतु त्यासाठी प्रथम ग्रंथसंग्रह झाले पाहिजेत. १८६७ पूर्वी सुमारें दीड हजार पुस्तकें प्रसिद्ध झालीं असलीं पाहिजेत असा प्रा. प्रियोळकरांचा अंदाज आहे. पैकी सुमारें ९४० पुस्तकांचा उल्लेख ग्रँट व पील यांच्या सरकार प्रेरित कॅटलॉगमध्ये झाला होता. तर मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील प्रस्तुत यादींत फक्त २९५ पुस्तकांचा समावेश होऊं शकला म्हणजे ऐवढींच पुस्तकें आज पहावयास मिळालीं ! इतक्यांतच सर्वांनी कसून प्रयत्नाला सुरुवात केली तर आणखी पुस्तकें अन्यत्र मिळूं शकतील आणि त्यांचें संयुक्त क्रमपुस्तक ( यूनिअनकॅटॅलॉग ) अभ्यासकांना उपयुक्त होईल. मराठी भाषिकांना अत्यंत आवश्यक असणारें हें प्राथमिक

काम करण्याची आवश्यकता आणि तद्विषयक अस्तित्वांत असलेली लाजिरवाणी स्थिति प्रामुख्याने विचारवंतांच्या नजरेस आणण्याची कामगिरी या प्रकाशनाच्या द्वारा साधल्याबद्दल मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या सुवर्णमहोत्सव संचालकांचे महाराष्ट्राने आभारच मानले पाहिजेत. महाराष्ट्रांतील ग्रंथालयचळवळीला तात्त्विक प्रेरणा देण्याचें काम हें पुस्तक करील अशी आशा वाटते.

—दि. वि. काळे

रा. रा. सम्पादक

## महाराष्ट्र साहित्य पत्रिका यांसः—

सा. न. वि. वि. :—

पत्रिकेच्या जुलै-सप्टें. १९४९ च्या अंकांत पृ. ४५ वर मी संपादिलेल्या **शास्त्री दप्तरांतील वेंचे** या पुस्तकावर अभिप्राय देतांना अभिप्रायलेखक म्हणतातः—

'सूचिहि इंग्रजींतच आहे ... मराठी साधनग्रंथाची सूचि इंग्रजींत छापणें म्हणजे परभाषेची मराठीवर जबरदस्ती होय. पेशवे दप्तरांत नानासाहेबांनीं जें केलें त्याचेंच येथे अनुकरण होत आहे हें खरें पण पेशवे दप्तराचें संपादन इंग्रजी राज्यांत मुंबई सरकारसाठीं झालें. प्रस्तुतचें हें ग्रंथसंपादन स्वातंत्र्यकालांत गायकवाड सरकारसाठी झालेलें आहे. या दृष्टीने संपादकांनी कांही तारतम्य दाखाविणें जरूर होतें."

अभिप्रायलेखकाने ग्रंथलेखकाला किती झोडपावें याला कांहीं मर्यादा असली पाहिजे. **शास्त्री दप्तरांतील वेंचे** या पुस्तकाला दोन सूची आहेत. इंग्रजी मजकुराची इंग्रजींत आणि मराठी मजकुराची मराठींत; परंतु अभिप्रायलेखकाने समूळ ग्रंथ न पहातांच त्याला दूषण दिलें आहे.

स्वातंत्र्यकाल वगैरे बडे शब्द ठीक आहेत; पण गायकवाडी इतिहासास साधनीभूत नऊ पुस्तकें काढणाऱ्या माझा असा अनुभव आहे कीं, महाराष्ट्राबाहेर मराठी इतिहासाचें उज्ज्वल स्वरूप प्रकट करावयाचें असल्यास इंग्रजी भाष्याची कास धरल्यावांचून गत्यंतर नाही. कलकत्ता विद्यापीठांत मराठी इतिहासाचें जसें चिकित्सापूर्व अध्ययन होत आहे तसें महाराष्ट्रांत होत नाही; आणि महाराष्ट्राबाहेर मराठी साधनांचा उपयोग करण्यास संशोधकांना उत्तेजन यावयाचें तर तीं इंग्रजी प्रस्तावनादिकांनी मंडित होणें अवश्य आहे. कळावें.

पुणें शहर
ता. २८।१०।४९

आपला
**चिं. वि. जोशी.**
( निवृत्त राज्यदप्तरदार बडोदें ).

**काव्याचीं भूषणें**—[ 'पारिजात' प्रकाशन, पुष्प १६ वें. ले. प्रा. म. वा. धोंड, कर्नाटक कॉलेज, धारवाड. पृष्ठें २२८, किं ५ रु. ]

प्रस्तुत पुस्तक प्रकाशित करून प्रा. धोंड यांनी अलंकारशास्त्रावरील मराठी वाङ्मयांत बहुमोल भर टाकली आहे. आजवर अलंकारांवर जीं अगदींच थोडीं पुस्तकें मराठींतून लिहिलीं गेलीं तीं बहुंशीं भाषांतरित स्वरूपाचींच. जें संस्कृतांत आहे तें जवळ जवळ जसेंच्या तसेंच मराठींत आणण्यापलीकडे त्यांनी विशेष कांही केलें नाही. नाही म्हणावयास कांही कांही ठिकाणीं मोरोपंत, वामन पंडित, इत्यादिकांचीं कवनें उदाहरणामध्यें समाविष्ट करण्याचा थोडासा प्रयत्न झालेला त्यांत दिसून येईल. तांबे, बी, माधवराव पटवर्धन, इत्यादि अगदीं अलीकडच्या कवींच्या कवितासंग्रहांतील रसाळ व समर्पक उदाहरणें निवडून तीं या पुस्तकांत बऱ्याच मोठ्या प्रमाणांत ग्रथित करण्यांत आलीं आहेत, हें त्याचें प्रमुख वैशिष्ट्य होय, आणि हें वैशिष्ट्य प्रस्तुत पुस्तक विद्यार्थ्यांस व अभ्यासू वाचकांस अतिशय मनोरंजक, अतएव प्रिय वाटण्यास खात्रीने मदत करील.

पुस्तकाच्या प्रारंभीं प्रस्तावना म्हणून जीं पांच प्रकरणें लेखकाने लिहिलेलीं आहेत, तीं या पुस्तकाचाच एक महत्त्वाचा भाग म्हणून मानावयास हरकत नाही. त्यांतील मजकूर निस्संशय उपयुक्त आणि विचारार्ह आहे. त्यापैकी पहिल्या प्रकरणात अलंकारशास्त्रावर संस्कृतमध्ये अथपासून रसगंगाधरापर्यंत जी ग्रन्थरचना झाली, तिचा इतिहास अगदीं थोडक्यांत पण चांगला सांगितला आहे. मात्र त्याबरोबरच, पुस्तकांत कोठेतरी, मराठींत जें कांही अल्पस्वल्प लेखन आतांपर्यंत अलंकारावर केलें गेलें आहे, त्याचा, त्या त्या लेखकांच्या नामनिर्देशासह अगदी थोडक्यांतच कां होईना, पण आढावा प्रस्तुत लेखकास सहजासहजीं घेतां आला असतां, तर तेवढेंच बरें झालें असतें.

दुसऱ्या प्रकरणांत विद्वान् लोक अलंकारांना आजवर काव्यदेवतेचे दागिने समजत आल्याने त्यांच्या यथार्थ स्वरूपाचें आकलन आणि मूल्यमापन हीं जशीं व्हावीं तशीं होऊं शकलीं नाहींत, हें दाखवण्याचा प्रयत्न लेखकाने केलेला आहे. हें सर्व प्रकरण वाचल्यास 'अलंकार हे स्वाभाविकच आहेत. त्यांना आपण अंगावर चढवतों त्या दागिन्यांप्रमाणे काव्याहून वेगळें समजण्याचें कांहीएक कारण नांही' इतकेंच प्रतिपादन करण्याचा लेखकाचा हेतु असावा असें वाटूं लागतें. एक तर हा मुद्दा मुळींच नवीन नाहीं. प्रा. रा. श्री. जोग यांनी आपल्या 'अभिनव काव्यप्रकाशांतील 'अलंकारविचार' या प्रकरणांत हीच गोष्ट विस्ताराने व नीटपणें सांगितलेली आहे. नाहीं म्हणावयास प्रा. धोंड यानी एकाद दुसरें उदाहरण देऊन ती गोष्ट आणखी गळीं उतरवण्याचा प्रयत्न केला आहे, इतकेंच. पण तें एक असो. मला जें म्हणावयाचें आहे तें हे, कीं या मुद्याखेरीज मुख्य अशी जी एक गोष्ट लेखकाने 'अलंकारांचें स्थान व कार्य' या प्रकरणांत कोठेतरी सांगणें अतिशय अगत्याचें होतें, ती गोष्ट कोठेच सांगितलेली नाही. वास्तविक पहातां 'अलंकारांसाठी अलंकार लिहिण्याचा मोह कवीने टाळावा. त्या मोहाला तो अगदीं थोड्याच ठिकाणीं व अल्प प्रमाणांतच जरी बळी पडला, तरी तेवढ्यापुरती ती रचना कृत्रिम वाटते व तेथे काव्यसौंदर्याची हानि होते. पण तेच अलंकार 'ध्वन्यालोक' काराने सांगितल्याप्रमाणे अपृथग्यत्ननिर्वर्त्य असले, म्हणजे रसप्रधान काव्य लिहितां लिहितां ते अगदीं सहज, आपोआप निष्पन्न झाले, तरच ते

काव्याच स्वाभाविक सौन्दर्य वाढवणारे ठरतात.' असा मुख्य सिद्धांत या प्रकरणांत कोठेंतरी निरसंदिग्धपणें मांडला जाणें फार जरूरीचें होतें.

चाव्या प्रकरणांत आजवर मराठींत विपुल काव्यरचना झालेली असल्याने आतां आपण पूर्वीप्रमाणे केवळ संस्कृत अलंकार-शास्त्रावरच भागवून न घेतां मराठीचें स्वतत्र असें अलंकारशास्त्र निर्माण करावास पाहिजे, असें आपलें मत लेखकाने प्रकट केलें आहे, तें खरो-खरच स्वागतार्ह आहे; पण त्याच विचारसरणीप्रमाणे लेखकाने प्रस्तुत पुस्तकांतहि केवळ मम्मटाच्या काव्यप्रकाशाला धरूनच सर्व विषय न मांडता आपल्या मनात उदित झालेल्या नव्या कल्पनेप्रमाणे थोड्याबहुत प्रमाणांत का होईना, पण त्याची रचना केली असती, तर वाचकांना अपेक्षापूर्तीचें थोडेंतरी समाधान लाभलें असतें !

मात्र याच प्रकरणांत, मराठीचें स्वतंत्र अलंकारशास्त्र करावयाचें झाल्यास कोण-कोणत्या गोष्टी विचारांत घ्याव्यात याबद्दल लेखकाने कांही सूचना केल्या आहेत. त्यां पैकी कांही निस्संशय ग्राह्य वाटतात. उदा० संस्कृतात अलंकारशास्त्रकारांनी कांही अलं-काराचे असंख्य पोटभेद विनाकारणच निर्माण केल्यासारखे आहेत, ते पोटभेद मराठीच्या अलंकारशास्त्रांत शक्य तेवढे कमी करण्यांत यावेत. तसेंच इंग्रजी अलंकारशास्त्रांत वर्णिलेले Onomatopoeia सारखे जे कांही अलंकार मराठी वाङ्मयांत आढळतात, पण ज्यांचा समावेश आपल्या अलंकारशास्त्रांत आजवर केला गेला नाही, ते अलंकार आता नवीन शास्त्रांत अवश्य ग्रथित करावेत, इत्यादि. परंतु प्रत्यनीक, मीलित, अतद्गुण वगैरे अनेक अलंकार सुदर असले, तरी लेखकाने वाचलेल्या मराठी वाङ्मयांत त्याला ते आढळले नाहीत, किंवा जे थोडे आढळले, ते अगदी चारदोनच ठिकाणीं आढळले, म्हणून ते अलंकार नव्या अलंकारशास्त्रांत अजिबात वर्ज्य करावेत हें लेखकाने मांडलेलें मत मात्र मुळीच स्वीकारार्ह वाटत नाही. जें खरोखर सुंदर आहे, तें आजवर आपल्या वाङ्मयांत आलेलें नसलें, तरी यापुढे आणावयास काय हरकत आहे ? अ-सुंदर असेल, तें अवश्य काढून टाकावें, पण सुंदरता निर्माण करणारे प्रकार वाढतील तितके हवेच आहेत ! उलट असे अद्याप आपल्या वाङ्मयांत न आढळलेले अलंकार कवींच्या पुढे आणले गेले, तर ते त्यांस खात्रीने नव्या वाङ्मयांत समाविष्ट करतील, आणि तेणेकरून आपली भाषा, आपलें वाङ्मय, आपलें शास्त्र, हीं वस्तुतः अधिकच समृद्ध, आणि सौंदर्यमय होतील.

उदाहरणादाखल येथे आपण 'प्रत्यनीक' हा अलंकार घेऊं या. 'आपला शत्रु आपणांहून बलिष्ठ असला, आणि त्यामुळे कोणत्याहि उपायाने आपण त्याचें कांहीएक वांकडें करूं शकत नाही हें एकदा कळून चुकल्यावर मनुष्य त्याच्याशीं संबंध असलेल्या दुसऱ्याच एखाद्या व्यक्तीवर वा वस्तूवर आपला राग काढतो, आणि त्यामुळे उलट त्याच्या शत्रूचेंच श्रेष्ठत्व प्रस्थापित होण्यास मदत होते' हें प्रत्यनीक अलंकाराचें आधारभूत तत्त्व. या अलंकाराचें उदाहरण लेखकास त्याने वाचलेल्या मराठी वाङ्मयांत कोठें सापडलें असलें किंवा नसलें, तरी तें म्हणजे सर्वसाधारण मानवी स्वभावाचाच एक विशेष होय, आणि त्या स्वभावविशेषाचीं उदाहरणें व्यवहारांत पदोपदीं सांपडणारीं आहेत. जें सुंदर आहे, तें परि-चयाचें नसलें, तरी कवींपुढे आणावें हें वर सांगितलेंच. मग जें सुंदर आणि नेहमीं अनु-भवास येणारें आहे, तें केवळ आजवर फारसें कुठे दिसलें नाही म्हणून वर्ज्यच करून टाकावें, हें कसें पटणार !

'प्रत्यनीक' अलंकाराची वाचकांस नीट कल्पना यावी, म्हणून प्रस्तुत पुस्तकांतच त्याचें एक भाषांतरित उदाहरण लेखकाने दिलें आहे, तें येथें देतों :—

'ज्यानें शिरा उडविलें, अपकार त्यास
नाहीं करूं शकत, हें उमजोनि खास
संताप राहु-मनिं हो शमवावयाला
तद्वक्त्रतुल्य ग्रसुनी छळि चन्द्रम्याला.'

( भावार्थ— ज्या विष्णूने आपलें शिर उडविलें, त्याचें यत्किंचित् देखील पारिपत्य करितां येत नाही, म्हणून त्याच्या मुखाशीं ज्याचें साम्य आहे अशा चन्द्रालाच राहु वारंवार ग्रासून त्रास देतो. त्याच्या असें करण्यामुळे विष्णूचा मोठेपणाच जास्त सिद्ध होतो, नाही का ? )

तसेंच 'सहोक्ति' वगैरे कांही अलंकार मराठींत आजवर येऊन गेले असले, तरी सुंदर नाहीत म्हणून नव्या अलंकारशास्त्रांत ते घालूं नयेत अशी आणखी एक सूचना लेखकाने केली आहे. एखादा अलंकार सुंदर आहे किंवा नाही हें पुष्कळ वेळां तो अलंकार रचणाऱ्या कवीच्या त्यावेळच्या प्रतिभेवर अवलंबून असतें. 'सीतेसह राम वनांत गेला' यासारख्या वाक्यात 'सह' शब्दाची उक्ति असूनहि त्यांत सौंदर्याचा लेशहि नाही हें कबूल. पण त्या-ऐवजीं रघुवंशांतल्या तिसऱ्या सर्गांतील एक श्लोक मला आठवतो. त्याचें खाली दिलेलें भाषांतर पहाः—( संदर्भः- रघु आणि इन्द्र यांचें जोराचें युद्ध चालू असता इन्द्राने शेवटीं रघूवर आपलें वज्रच सोडलें. )

'छातीवर त्या वज्राचा जोरदार आघात झालेला रघु, ( मूर्च्छा येऊन आपल्या ) सैनिकांच्या अश्रूंसहच भूमीवर पडला. पण क्षणार्धांतच तें दुःख दूर सारून, सैनिकांच्या हर्षोद्गारांसह तो उठला देखील !'

असो. असे मतभेदाचे प्रश्न काही थोड्या ठिकाणींच उपस्थित होतात. एकंदरींत पहातां पुस्तकाची प्रस्तावना उपयुक्त आणि कांही अंशीं विचारप्रवर्तकहि आहे. प्रस्तावनेनंतरच्या भागात, म्हणजे खुद्द पुस्तकामध्यें निरनिराळे अलंकार, त्यांचीं लक्षणें, त्यांवरील सोदाहरण विवेचन, वगैरे मजकूर आलेला असून तो सर्वसाधारणपणें व्यवस्थित व सुबोधपणें मांडलेला वाटतो. एक लहानशीच बाब पुस्तक चाळतां चाळता सहज लक्ष्यांत आली, म्हणून लेखकाच्या नजरेस आणतो. १५८ पृष्ठावर 'काव्यलिंग' अलंकाराचें लक्षण लेखकाने दिलें आहे, तें असें:– 'एकाद्या गोष्टीचें जेव्हा चमत्कृतिपूर्ण कारण दिलेलें असतें, तेव्हां 'काव्यलिंग' अलंकार होतो.' अर्थात् एकंदरींत हें लक्षण ठीक आहे, पण या स्थूल विवेचनाबरोबर त्या अलंकाराच एक अगदी सूक्ष्म वैशिष्टयहि त्या अलंकाराच्या वर्णनांत कोठेतरी सांगण्यांत आलें असतें, तर तितकीच त्या अलंकारांतली खुमारी वाचकाच्या जास्त प्रत्ययास आली असती. तें वैशिष्ट्य असें:—जेथे काव्यलिंग अलंकार असतो, तेथे कार्य आणि कारण, दोन्ही वर्णिलेलीं आढळतात. पण त्या दोहोंमध्ये कार्यकारणसंबंध आहे, हें मात्र त्या उदाहरणांत कोठेंहि तृतीया अगर पंचमी विभक्ति वापरून म्हणा, किंवा 'मुळे' सारखें एखादें अव्यय उपयोजून म्हणा, स्पष्ट केलें जात नाही..तो संबंध सूचितच असतो. उदा० द्यूतांत राज्य गमावल्यानंतर इतर पांडवांसह वनवास भोगीत असलेला युधिष्ठिर एकदां दुर्योधनाचें राज्य कसें काय चाललें आहे हें पहाण्यासाठीं आपला एक हेर पाठवतो. तो हेर द्वैतवनांत परत येऊन त्याला सांगतोः—

'( पूर्वी ) कपट-द्यूताने जिंकलेली पृथ्वी दुर्योधन ( आता ) न्यायाने जिंकू पहात आहे.'

येथें 'पूर्वी कपटाने पृथ्वी जिंकली होती' हें 'आतां न्यायानें जिंकू पहात आहे.' याचें कारण आहे. पण हा कार्यकारणभाव वरील उदाहरणांत उघडपणें मात्र सांगितलेला नाही. 'पूर्वी कपटाने पृथ्वी जिंकली म्हणून तो आता न्यायाने वागत आहे' असें कवीने म्हटलेलें नाही.

अर्थात् ही लहानशी बाब जातां जाता आठवली, म्हणून सांगितली. एकंदर विषयाची मांडणी सुगम व विशद असून थोडक्यांत नीटपणें केलेली आहे. त्याशिवाय अलंकारांचीं उदाहरणें प्रारंभीं सांगितल्याप्रमाणे आधुनिक कवींच्या उत्तमोत्तम कवनांतून वेंचून अशीं घेतलेलीं असल्यामुळे त्यांत एक नवीन गोडी निर्माण झालेली आहे. पुस्तकाचे इतर विशेष आहेतच, पण केवळ येवढ्या एका वैशिष्ट्याबद्दल देखील कोणीहि प्रस्तुत पुस्तककर्त्याचें खात्रीनें अभिनंदनच करील.

—( प्रा. ) पु. ना. वीरकर.

**कांचेचें कवचः**— [ ले० रा. भि. जोशी, प्रकाशक; वा. वि. भट. अभिनव प्रकाशन, मुंबई १४. किंमत २ रूपये. ]

या संग्रहांत श्री. रा. भि. जोशी यांनी लिहिलेल्या, "बऱ्याच, श्री. प्रभाकर पाध्ये 'धनुर्धारी' चे आणि कांहीं दिवस 'यशवंत' चे संपादक असतांना त्यांच्या प्रोत्साहनामुळे आणि त्यांच्यासाठीच" ( प्रस्तावना ) लिहिलेल्या, अशा एकंदर बारा गोष्टी एकत्रित केल्या आहेत. पैकी 'क्रिकेट क्रिकेट' आणि 'मगरींचें चित्र' या बालमनाचें दर्शन करविण्याच्या दृष्टीने लिहिल्या असाव्यात असें वाटतें. असें असेल तर त्यांच्या परिणामकारकपणाविषयी जरा शंका वाटते. कारण, 'क्रिकेट क्रिकेट' या गोष्टींत मुलांची खेळाविषयीं परिचित आतुरता जरी ध्यानीं येते, तरी मनावर ठसा उमटतो तो हेडमास्तरांच्या स्वार्थी धोरणाचा, इन्स्पेक्टरला खुष करून स्वतःला चांगला शेरा मिळविण्याच्या खटाटोपाचा. याच दृष्टिबिन्दूवर कथेंत जोर असता आणि बालमनाच्या आशा – निराशेचा उपयोग बोलक्या पार्श्वभूमीसारखा केला असता तर अधिक बरें झालें असते. 'मगरींचें चित्र' आचार्य अत्रे यांच्या 'ठोकळ्याचें चित्र' या सुंदर चित्राची आठवण करून दिल्याशिवाय रहात नाही. आचार्यांच्या चित्रांत जे संयम, सूचकता, मुग्ध काव्य आणि परिणामकारकता इत्यादि गुण आहेत, त्यांचा जवळजवळ अभाव येथे आहे. श्री. म. वि. राजाध्यक्ष यांनीं 'मास्तरांचे मास्तर' नांवाची एक गोष्ट लिहिली आहे; त्यांत मास्तरांचे मयूर प्रश्न आणि कोवळ्या मुलांचा असहाय थरकांप यांचें सुरवातीला जें चित्र आहे तें अधिक परिणामकारक आहे.

बाकीच्या बहुतेक गोष्टींचा विषय या ना त्या रीतीने मनुष्याच्या लैंगिक जीवनाशीं संबद्ध असा आहे. कामभावनेने अनावर झालेली विधवा तुळशी किंवा उपेक्षित पद्मा, नवऱ्याने टाकलेली आणि कामवासनेला बळी पडलेली राजम् किंवा नवऱ्याला सोडून दुसऱ्याबरोबर संसार थाटणारी गोपी आणि पांगळ्याची आई, गूढ नवख्या शारीरीक आकर्षणाने थरथरणारे विंदाप्रसाद आणि मुन्नी हें नवपरिणीत जोडपें, नर्सला बाहुपाशांत घेणारा डॉक्टर, किंवा काचेच्या कवचाआड दडलेली आणि कामभावनेपासून दूर पळूं पहाणारी सरला ... इत्यादि व्यक्तींच्या द्वारे, साक्षात् किंवा अप्रत्यक्षपणें, या लैंगिक भावनेचें दर्शन आपल्याला होतें. सामान्यपणें या चित्रांत कांही नवा दृष्टिबिन्दू किंवा कांही विशेष सूचन आहेसें वाटत नाही. कामभावना

उदित होऊन त्या ' उसळत्या लाटेवर ' मनुष्य जसा वहात जातो आणि वागतो त्याचें जसेंच्या तसें रेषाचित्र येथे बहुधा आढळून येतें. जेथे कांही सांगावयाचा, विशेष मनोदर्शन करविण्याचा, प्रयत्न आहे अशी, पुस्तकाला शीर्षक झालेली ' कांचेचें कवच ' ही गोष्ट मात्र आहे. परंतु मूळ ' साहित्यांत ' प्रसिद्ध झालेल्या या गोष्टीचा शेवट संग्रहांत का बदलून टाकला आहे हें ध्यानीं येत नाही. मुळांत सरलेच्या शेवटच्या उद्गारांत (" कोंबडीच्या पिलांना जें करतां आलं तें माणसालाहि करता येईल. ") स्वतःच्या समजणाऱ्या, सांगावयाला कठीण, अशा अबोल भीतीची आणि आपल्या वर्तनामुळे झालेल्या नवऱ्याच्या वेदनाकुल कुचंबणेची जी सहृदय जाणीव आहे आणि त्यामुळे तिच्या मनाला आलेली जी निश्चितता आहे त्या दोहोंचा शेवट प्रस्तुत शेवटांत झाला आहे. अनिश्चितता जीवनाच्या दृष्टीने वास्तव असली तरी तिचा उपयोग कलादृष्ट्या झाला तर मोहक असतो. प्रस्तुत ठिकाणीं मात्र, बिचारा मास्तर सहानुभूतीने एका पोरीला मदत करायला गेला आणि एक थंड ( Frigid ) बायको करून बसला, असा अंतिम परिणाम मनावर झाला तर वाचकाचा कांही अपराध होणार नाही.

श्री. जोशी यांचें जग एका दृष्टीने विविध असूनहि मर्यादित आहे. त्यांत दक्षिणेकडची तेलगु मंडळी आहेत, उत्तरेकडची मुन्नी—बिंदाप्रसाद आहेत, 'मजूरणी' आहेत; पण त्यांच्यात वैशिष्ट्य नाही, मुलुखाचा ठसा असा नाही. त्यांची एकदोन तेलुगु किंवा हिंदुस्तानी वाक्यें सोडलीं तर तीं कुठेहि सामावून जातील. विशिष्ट जातिगोताचा किंवा सामाजिक थराचा किंवा कांही उर्दू शब्दाचा, किंवा स्थळांच्या नावाचा जो वापर त्यांनी केला आहे त्याचा उपयोग वातावरण-निर्मितीला पण फारसा झालेला दिसत नाही.

ही कदाचित् कथालेखनांतील कांही उणीव असावी. गोष्टीच्या विकासांत नको असलेला भाग बराच येतो. उदाहरणार्थ, ' कांचेच्या कवचांत ' सरला आणि तिचा मास्तर नवरा यांची जी दीर्घ हकिकत आहे, त्याच्या मर्यादित, पुस्तकी, सुधारणेच्या जगाचा जो उल्लेख आहे, त्याची कथावस्तूला कांही जरूरी आहे असें नाही. या गोष्टींत शेवटीं अकारण संकोच केला आहे तर ' राजम् ' ' गोपी ' या गोष्टींत या स्त्रियांच्या जीवनांतल्या घटना कांही सांगावयाच्या शिल्लकच ठेवल्या नाहीत. कथाविकासांत एकप्रकारची निवड असावी लागते.

त्याचबरोबर जीवनांतल्या नेहमीच्या ओळखीच्या घटना उचलल्या तरी त्यांच्या दर्शनात कांही दृष्टि, कांही आशय असावा लागतो. जवळच्या माणसाचे, मुलाचे, भावाबहिणींचे मृत्यु, या घटनेचें श्री. जोशी यांना आकर्षण आहेसें दिसतें. यांतलें दुःख परिचयाचें आहे. पण त्यामुळे त्यांच्या व्यक्तिचित्रांवर कांही वेगळा प्रकाश पडला आहे असें झालें नाही. नुसत्या मृत्यूच्या आणि दुःखाच्या नोंदींत कांही मर्म आहे किंवा कला आहे असें वाटत नाही. या दृष्टीने प्रा. गाडगिळांची ' शीतकण ' ही गोष्ट पहावी. श्री जोशी यांचा " निरुद्देश प्रवास " झाला आहे.

गोष्टीपेक्षां प्रसंगच श्री. जोशी अधिक परिणामकारक करूं शकतात. ' गोष्ट ' कसली, एक प्रसंगच, हा आपल्या नित्य दृष्टीस पडणारा" असा गोष्टींतच प्रस्ताव करून लिहिलेलें "सज्जावरून" हें प्रसंगचित्र वास्तव वर्णन, सूचकता आणि आशय या दृष्टीने सर्व संग्रहांत उमटून पडतें. उगाच वाढवीत बसले नसते तर " नवी नवरी " हें चित्रहि वेधक झालें असतें.

पुढे जर कोणाच्यासाठी लिहितांना श्री. जोशी प्रसंगचित्रावर भर देतील तर त्यांना यश येईल असा माझा समज आहे. —(प्रा.) गोविंद केशव भट.

अनुक्रमणिका

**विठ्ठलभाई पटेल— चरित्र व आठवणीः**— [ ले. ज. गं. करंदीकर, प्रका. नॅशनल इन्फर्मेशन ॲण्ड पब्लिकेशन्स लि. मुंबई, मूल्य ४॥ रु. ]

महात्मा गांधीजींनी राजकारणाचीं सूत्रें हातीं घेण्यापूर्वी लोकमान्य टिळकांच्या बरोबरीने ज्यांनीं स्वातंत्र्याचा लढा केला, अशा व्यक्तींत गुजरायचे खंदे वीर विठ्ठलभाई पटेल हे एक आहेत. यांचें चरित्र श्री. करंदीकर यांनी लिहून एक अभिनंदनीय कामगिरी केली आहे. महाराष्ट्रांतील नामवंतांचीं चरित्रें मराठी वाचकांनी वाचावीं त्याजबरोबर महाराष्ट्रेतर पुढाऱ्यांचींही चरित्रें मराठी वाचकाना उपलब्ध होणें आवश्यक असतें. हेंच प्रस्तुत पुस्तकाचें महत्त्व आहे. शक्य तों अस्सल साधनें जमवून लेखकाने कै. विठ्ठलभाई पटेल यांचें चरित्र लिहिलें आहे. नायकाची निर्भय वृत्ति, स्पष्टवक्तेपणा, कर्तव्यतत्परता, आणि त्याग या सात्त्विक गुणाचें ठिकठिकाणीं योग्य तऱ्हेने विवेचन झालें आहे. चरित्रलेखनांत दोन गोष्टींना सामान्यतः महत्त्व असतें. १. साधनें व २. साधनाच्या साहाय्याने प्रतीत होणाऱ्या चरित्रव्यक्तीच्या जीवनाचा अर्थ लावणें. हा अर्थ लावतांना पुष्कळदा चरित्रकाराच्या मनोवृत्तीचा लेखनावर परिणाम झाल्याविना राहात नाही. कै. विठ्ठलभाई पटेल याच्या वर्तनाचा मानसशास्त्रदृष्ट्या विचार केल्यास त्यांची मनोवृत्ति शठम् प्रति शाठ्यम् या न्यायाची होती. ध्येयप्राप्तीला साधनें कोणतीं असावींत यांत त्यांनी ध्येयप्राप्तीवर दृष्टि ठेवली, साधनांचा विचार गौण ठरविला असेंच आपणास दिसून येईल. टिळकांच्या राजकारणात ही वृत्ति ठीक बसली व त्यामुळे महाराष्ट्राने विठ्ठलभाईंच्या पुढारीपणाला मान्यता दिली. पुढे स्वराज्य-पक्षांतहि पटेलांचें प्रमुख स्थान होतें. यासंबंधीचें चरित्रकाराचें वर्णन चांगलें झालें आहे. चरित्रकारहि याच मनोवृत्तीच्या कलाचे आहेत याचा पुरावाहि स्पष्ट तऱ्हेने मिळूं शकतो. महात्मा गांधींच्या मनोवृत्तीशीं वरील वृत्ति विरोधी होती. महाराष्ट्राने महात्मा गांधींच्या राजकारणाला प्रामुख्याने विरोध केला. विठ्ठलभाई पटेल यांनीहि कित्येक वेळां स्पष्ट शब्दांत हा विरोध प्रगट केला. परंतु या दोन्ही विरोधांत जो फरक आहे तो फरक जितका स्पष्ट व्हावा तितका प्रस्तुत ग्रंथांत झालेला नाही. पटेलांच्या मनांत महात्मा गांधींच्या चारित्र्याबद्दल नितांत आदर होता. त्यामुळे महात्मागांधीप्रणीत सत्याग्रहांत पटेलांनी मनःपूर्वक भाग घेतला. महाराष्ट्रांतील टिळकानुयायी पुढाऱ्यांत ही वृत्ति क्वचित दिसून आली. एकंदरींत प्रस्तुत चरित्र अभ्यसनीय झालें आहे यांत शंका नाही.

**भारतभूषण पं. मदनमोहन मालवीय**— [ ले. रा. गो. भिडे, चित्रशाळा प्रकाशन, मूल्य १। रु. ]

श्री. भिडे यांनी १९२१ मध्यें मालवीयांचें एक चरित्र लिहिलें होतें. मालवीयांच्या मृत्यूनंतर अधिक माहितीची भर घालून प्रस्तुत चरित्र लिहिलें आहे. पं. मालवीयांनी हिंदु समाजाची केलेली महत्त्वाची सेवा लेखकाला आदरभूत वाटली म्हणूनच प्रस्तुत पुस्तकांत हिंदुसंघटन व तत्संबंधीं मालवीयांचीं कार्यें यावर अधिक भर दिलेला दिसून येतो. मालवीयांचें निर्मळ चारित्र्य सर्वांनाच आदर्शभूत होण्याजोगें आहे. मालवीयांचा पिंड धर्मनिष्ठतेचा, घरगुती संस्कार धार्मिक प्रवृत्तीचे, त्यांचे जीवनहि धर्माधिष्ठित, या गोष्टी ध्यानांत घेतल्या म्हणजे सत्य, दया, त्याग इत्यादि सात्विक गुणांचा अवतार पंडितजींच्या

चरित्रांत आपणास उत्कटत्वाने पाहावयास मिळतो. लेखकाने या गुणांचें दिग्दर्शन मधून मधून केलें आहे. राजकारणांत मालवीयांचा स्वतंत्र पंथ होता. कांही प्रसंगीं ते नेमस्त असत तर कांही प्रसंगीं ते जहाल होत. महात्मा गांधींच्या चळवळींत त्यांनी आत्यंतिक पुढाकार घेतला नसेल. परंतु म. गांधींच्या कार्याबद्दल त्यांच्या मनांत विलक्षण आदर होता हें त्यांनी केलेल्या सत्याग्रहावरून सिद्ध होतें. चरित्रलेखकाचें लक्ष या बाजूकडे विशेष गेलें नाही असेंच प्रस्तुत पुस्तकावरून म्हणावें लागतें.

**अहल्याबाई होळकरः**— [ ले. वा. दा. गोखले, प्रकाशक श्रीलेखन वाचन भांडार, लक्ष्मी रोड, पुणें २. मूल्य ॥। रु. ]

मराठी इतिहासांत ज्यांचीं नांवें चिरंतन राहतील अशा व्यक्तींपैकी अहल्याबाई या एक आहेत. अशा बाईचें एखादें सुटसुटीत चरित्र मराठींत असावें या हेतूनेच हें पुस्तक लिहिलें आहे. दंतकथा व आख्यायिका बाजूला ठेवून ऐतिहासिक पत्रांच्या साधनाने प्रस्तुत पुस्तक लिहिलेलें असल्यामुळे या पुस्तकाला एक प्रकारचें महत्त्व आलें आहे. श्री. दादासाहेब मावळंकर प्रस्तावनेंत म्हणतात त्याप्रमाणेंच ' अशा अद्वितीय स्त्रीरत्नाचें थोडक्यांत व मनोहर असें चरित्र मराठी वाचकांस लेखकाने दिलें आहे.'

**महात्मा फुलेः**— [ ले. आ. अ. मानकर, प्रकाशक श्रीलेखन वाचन भांडार, मूल्य १ रु. ]

राजकारणाच्या चळवळीचा पूर ओसरल्याबरोबर महाराष्ट्रजनता एका विचित्र वातावरणांत आज सांपडली आहे. स्वराज्याला लायक अशी जनतेची मनोवृत्ति तयार न झाल्याने आजचा समाज या फेऱ्यात सांपडला. हें टळावें म्हणून राजकारणाच्या सुरवातीपासूनच बरोबरीने समाजकारणाची दूरदृष्टि ठेवून ज्यांनी कार्य केलें अशा महनीय व्यक्तींत महात्मा फुले एक होते. श्री. मानकर यानी याच वेळीं हें चरित्र लिहून महाराष्ट्राच्या उद्धारांत कोणती गोष्ट दुर्लक्षित झाली याचें विवेचन निःपक्षपातीपणाने केलें आहे.

**शैक्षणिक मानसशास्त्रः**—[ले. प्रि. शं. ब. सुखटणकर, सातारा, मूल्य २ रु.]

प्रि. सुखटणकर हे आज कित्येक वर्षे अध्यापक-विद्यालयांत अध्यापन करीत असल्यामुळे प्रस्तुत पुस्तक लिहिण्याबद्दल त्यांचा अधिकार सिद्ध होत आहे. मानसशास्त्राचीं विविध तत्त्वें सोप्या व सरळ भाषेत, घरगुती पटण्याजोग्या उदाहरणांसह लेखकाने विवेचित केली असल्यामुळे अभ्यासकांना या पुस्तकाचा फार उपयोग होईल. स्वराज्यांतील सरकारानें मूलोद्योग हें शिक्षणाचें केंद्र बनविलें आहे. साहजिकच इंग्रजी अमदानींतील शिक्षणाकडे पाहण्याचा दृष्टिकोन तत्कालीन अभ्यासपद्धति, अध्यापन साधनें, या शिक्षणविषयक घटकांत आमूलाग्र बदल झाला आहे. प्रस्तुत पुस्तक लिहितांना हा बदल लेखकाने दृष्टीसमोर ठेविला असल्यामुळे पुस्तकाची उपयुक्तता वाढली आहे.

—काश्यप

भाषाभगिनींचा संसार

## जगदीशचीं पत्रें

**प्रिय शरद्,** भावनगर
ता. ... ... ...

आंतरप्रांतीय साहित्यविषयक तुझी जिज्ञासा क्षणोक्षणी वाढत चालली आहे हें तुझ्या पत्रावरून मला दिसत आहे. गुजराती साहित्यांत प्रसिद्ध होणारीं नवीन पुस्तकें ह्यात तुला मी मार्गदर्शन करावें असें तुझें म्हणणें आहे. तुझी जिज्ञासा शक्य तितकी तृप्त करण्याचा मी प्रयत्न करीन. या पत्रापासूनच सुरू करतों. शुभंच शीघ्रम !

गुजराती लघुकथाक्षेत्रांत प्रथम स्थानीं असलेले श्री धूमकेतु यांची ऐतिहासिक कादंबरी **'गुर्जरेश्वर'**[1] त्यांच्या ऐतिहासिक चौलुक्य ग्रंथमालांतील ' वाचिनीदेवी ' चौलादेवी, 'राजकन्या' वगैरे सारखीच तेजस्वी आहे. सिद्धराज जयसिंह ह्याच्या निधनानंतर कुमारपाल गुर्जरेश्वर होतो, त्या समयाचें रेखांकन हुबेहूब वठविलें आहे.

त्यांचेंच दुसरें पुस्तक **'जीवनपंथ'**[2] यांत भूतकाळच्या जीवनाचीं विविध संस्मरणें सुंदर शैलींत मांडली आहेत. पूर्वी ह्याची लेखमाला 'ऊर्मि' मासिकांत तूं वाचली आहेस ना ? तिचेंच हें ग्रंथस्वरूप आहे. शिशुअवस्थेतील हर्षशोक, सुखदुःख, ग्लानिभय सारें पुन्हा पुन्हा जागृत होतात.

श्री. रमणलाल देसाई, हे गुजराती जनतेचे लोकप्रिय कादंबरीकार. त्यांच्या **झंझावात** नांवाच्या कादंबरीचा दुसरा भाग नुकताच बाहेर पडला आहे. हल्लीच्या समाजाची अवस्था ह्या कादंबरींत फारच सुरेख तऱ्हेने प्रतिबिंबित झालेली आहे.

विवेचनक्षेत्रांत बरीच भर पडलेली दिसून येते. महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या पुण्याच्या अधिवेशनांत तूं हजर होतास. त्यात कविसंमेलनाच्या वेळीं उमाशंकर जोशी ह्यांचा कवि म्हणून परिचय दिला गेलेला होता. त्यांचे **'सम संवेदन'**[3] हें विवेचनामधील पहिलेंच पुस्तक आहे. सुरत कॉलेजचे प्राध्यापक विष्णुप्रसाद त्रिवेदी ह्यांचें **'परिशीलन'**,[4] बरोडा कॉलेजचे प्राध्यापक श्री. अनंतराय मरावळ ह्यांचे **'गंधाक्षत'**[5] व श्री. डोलराय मांकड ह्यांचें **काव्यविवेचन** ह्या ग्रंथांनी विवेचनसाहित्यांतील अनेक वादग्रस्त प्रश्न सोडवले आहेत. प्रत्येक संग्रहांत लेखकाच्या मर्मग्राही, स्वतंत्र दृष्टिची व सखोल अभ्यासाची जाणीव पदोपदीं होतेच.

आतां संपादित साहित्य. चटकन लक्ष वेधेल असा ग्रंथ म्हणजे धीरुभाई ठाकर संपादित **'मणिलाल विचारधारा'**.[6] पंडितयुगामधील प्रथम पंक्तीचे महारथी, समर्थ निबंधकार, भारतीय धर्म, संस्कृति व तत्त्वज्ञानाचे निष्ठावंत वकील श्री. मणिलाल नथूभाई ह्यांचा विचारसंग्रह ह्या ग्रंथांत केलेला आहे.

---

१ प्रकाशकःगुर्जर ग्रंथरत्न कार्यालय, अमदावाद. किं. ४-८-०
२ प्रकाशकःगुर्जर ग्रंथरत्न कार्यालय, अमदावाद. किं. ४-८-०
३ जीवन साहित्य मंदिर, बडोदा. किं. ३ रुपये
४ गांडीव साहित्य मंदिर, सुरत. किं ४ रुपये
५ एन्. एम्. त्रिपाठी लि. मुंबई. किं. ४ रुपये
६ गुजरात विद्यासभा, अमदावाद. किं. ४-८-०

नवजीवन कार्यालयाचें नरहरि परीखनी संपादन केलेलें ' महादेवभाईची डायरी '[1] याचा तिसरा भाग नुकताच प्रसिद्ध झाला आहे. दुसऱ्या भागांत उपोषण आणि मन्दिर विषयक गांधीजींची भूमिका फारच स्पष्टपणें मांडण्यांत आली होती. ता. ५–९–३२ ते ता. १–१–३३ पर्यंतची ही डायरी होती. हा त्याचा पुढील भाग आहे. हा भागहि तितकाच लोकादरास पात्र झालेला आहे. त्यांचेंच दुसरें महत्त्वाचें प्रकाशन म्हणजे 'सरदार वल्लभभाईनां भाषणो'.[2] त्यांच्या भाषणांचा प्रातिनिधिक असा संग्रह हा प्रथमच प्रसिद्ध होत आहे.

काव्यसाहित्याच्या प्रदेशांत दृष्टिक्षेप केल्यास श्री जेठालाल त्रिवेदी, काव्यतीर्थ, ह्यांचा 'अलका'[3] हा काव्यसंग्रह चटकन नजरेंत भरतो. प्रकृति, प्रणय, राष्ट्र आणि युगभावना ह्या संग्रहात सुयोग्य तऱ्हेनें वटलेल्या आहेत. तसाच श्री. मीनु देसाई यांचा 'निमीष' गांधीजीविषयक काव्याचा एक संग्रह 'गांधीकाव्यसंग्रह'[4] श्री. वि. मो. गांधी यांनी संपादित केला आहे व १९१०ते१९४८मधील गुजराती कवितेचा प्रातिनिधिक संग्रह 'काव्यसौरभ'[5] या नांवाखाली श्री. हिं. ग. अंजारिया ह्यांनी बाहेर पाडला आहे. पूर्वी ह्यांनीच 'काव्यमाधुर्य' नांवाचा असाच संग्रह बाहेर पाडला होता तो तूं वाचला असशीलच.

आतां अनुवादित साहित्याकडे वळूं. श्री. वि. स. खांडेकर यांच्या तीन कृति श्री. गोपाळराव विद्वांस यांनी अनुवादिल्या आहेत. त्यांचीं नांवें 'पहेली प्रीत, नूतन प्रभात, संध्यादीप. श्री. खांडेकर ह्यांच्या विविध वाङ्मयाचा आस्वाद श्री. विद्वांस गुजराती जनतेस चांगलाच करवित आहेत.

सिरियाचा महान् साहित्यकार खलिल जिब्रान हल्लीं गुजरातमध्ये फारच लोकप्रिय होत चालला आहे. त्याच्या कृतींचा सुंदर अनुवाद 'प्रवासी अने पुरोगामी'[6] या नावाखाली श्रीमती गजराबेन नायक ह्यांनी केला आहे. अनुवादांत त्यांनी बरीच काळजी दाखविली आहे.

गेली चारपांच वर्षे अप्राप्य असलेला नवजीवन कार्यालयाचा [7]सार्थजोडणीकोष प्रसिद्ध झाला आहे हें वाचून तुला सानंदाश्चर्य होईल. व्युत्पत्ति आणि शब्दप्रयोग हीं ह्या आवृत्तीचीं वैशिष्ट्यें आहेत. तसाच दुसरा कोष ' वैज्ञानिक शब्दसंग्रह '[8] श्री. पोपटलाल शाह यांनी संपादिलेला आहे. वैज्ञानिक इंग्रजी शब्दाचे गुजराती पर्यायस्वरूप त्यांनी दिले आहे.

मला वाटतें, आतां थांबावें हेंच बरें. कारण इतकें वाचशील तेवढ्यांत माझें दुसरें पत्र येईलच. बरें ! तेथें होणाऱ्या 'सायन्स कॉन्फरन्स'चा विस्तृत अहवाल मात्र पुढच्या पत्रीं पाहिजे. बरं का ?

तुझाच
जगदीश

---

१ नवजीवन कार्यालय. किं. ५ रुपये
२ नवजीवन कार्यालय किं. ५ रुपये
३ चन्द्रभानी जी. अ. महेता, अमदाबाद, किं. ३ रुपये.
४ रमणलाल सोनी, शरद कार्यालय, मोडासा via अमदाबाद किं. ३ रुपये.
५ अंजारियाः प्रभुकृपा, लक्ष्मीनगर, खार, मुंबई किं ३ रुपये.
६ एम. सी. कोठारी, रावपुरा, बडोदा. किं. ३ रुपये.
७ प्रकाशकः नवजीवन कार्यालय, अमदाबाद. किंमत बारा रुपये.
८ प्रकाशकः गुजरात संशोधन मंडळ, मुंबई. किंमत सहा रुपये.

# परिषद्वार्ता

( चिटणीसांकडून )

**कै. केळकर स्मृतिदिनः**—परिषदेचे माजी अध्यक्ष साहित्यसम्राट् कै. न. चिं. उर्फ तात्यासाहेब केळकर यांचा द्वितीय स्मृतिदिन रविवार दि. १६।१०।४९ रोजीं महा-महोपाध्याय प्रा. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखालीं साजरा झाला. याप्रसंगीं सुप्रसिद्ध चित्रकार रा. सा. स. कृ. पिंपळखरे यांनी दिलेल्या कै. केळकरांच्या तैलचित्राचेंहि अनावरण झालें.

**कै. डॉ. माधवराव पटवर्धन स्मृतिदिनः**—कै. डॉ. माधवराव पटवर्धन स्मृति-दिन मंगळवार दि. २९।११।४९ रोजीं परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. रा. श्री. जोग यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. प्रा. जोग यांनी 'विरहतरंग' या माधवरावांच्या काव्यावरील आक्षेपकांचा प्रामुख्याने आपल्या व्याख्यानांत परामर्श घेतला.

**आगामी संमेलनाध्यक्षांसाठीं नांवें:**—मे १९५० मध्ये मुंबई मराठी साहित्य संघाचे वतीने भरणाऱ्या साहित्य संमेलनासाठीं राजकवि य. दि. पेंढरकर व तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचीं नांवें सुचविलीं गेलीं आहेत.

**परीक्षाः**—परिषदेच्या सर्व परीक्षा १९, २० व २१ रोजीं झाल्या. यंदा पुढील-प्रमाणे उमेदवार बसले होते. प्रथमा–१०८७, प्रवेश ९६३, प्राज्ञ ८८३, विशारद १९७, व आचार्य १६. एकूण ३१४६. महाराष्ट्र व बृहन्महाराष्ट्र मिळून यंदा परीक्षांचीं ९२ केंद्रें होतीं.

**परीक्षावर्गः**—प्राज्ञ व विशारद वर्ग १० डिसेंबरपासून बंद झाले. विशारद वर्गात श्री. गोपीनाथ तळवलकर यांनीहि अध्यापन कार्य केलें. तसेच प्रा. रा. श्री. जोग, डॉ. के. ना. वाटवे, डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, प्रा. न. र. फाटक व कवि श्री. बा. भ. बोरकर यांनी विद्या-र्थ्यांच्या विनंतीवरून नेमलेल्या विषयांवर व्याख्यानें दिलीं. विशारद वर्गाचें स्नेहसंमेलन होऊन परिषदेला एक विजेचा दिवा व तबकडी भेट म्हणून विद्यार्थ्यांनी दिलीं.

**परिभाषा मंडळः**—रा. ब. न. स. जोशी, श्री. बेडेकर श्री. घाटे, श्री. महाजन प्रा. वीरकर इ. तज्ज्ञांच्या साहाय्यानें Hydro-electric व Irrigation या विषयाची 'जलवैजिक' व 'क्षेत्रपायनिक' परिभाषा तयार केली आहे. मूल्य आठ आणे.

**वा. गो. आपटे संदर्भ-ग्रंथ-संग्रह**— आपटे विश्वस्त मंडळाकडून दहा हजार रुपये देणगीपैकी मिळावयाचे रु. पांच हजार परिषदेकडे आले. ग्रंथसूचीचें काम सुरू असून बऱ्याच जुन्या ग्रंथांची भर संग्रहांत पडली आहे. या कार्याचें सर्व श्रेय आपटे विश्वस्त मंडळाचेंच आहे. परिषद त्या मंडळाची ऋणी आहे.

**ग्रंथ-देणगी** — केसरी मराठा संस्थेच्या ग्रंथसंग्रहाकडून पंच्याहत्तर पुस्तकें आपटे ग्रंथसंग्रहासाठी भेट म्हणून आलीं. कै. परशुरामतात्या गोडबोले, यांचे नातू श्री. स. रा. गोडबोले यांजकडून परशुरामतात्यांनी जमविलेल्या अनेक दुर्मिळ पुस्तकांचा व हस्त-लिखितांचा संग्रह परिषदेकडे आला आहे. या कामी डॉ. म. वि. आपटे व श्री. स. रा. गोडबोले यांचें फारच साहाय्य झालें त्याबद्दल परिषद त्यांची ऋणी आहे.

अनुक्रमणिका

ज्ञानेश्वरीची फार जुनी हस्तलिखित पोथी प्रा. वा. दा. गोखले यांनी मिळविली असून तीव्रद्दलचे संशोधन सुरू आहे.

**कार्यकारी मंडळाची सभा व सोलापूर जिल्हा साहित्य संमेलन—** सोलापूर येथील परिषदेच्या शाखेमार्फत सोलापूर जिल्हा साहित्य संमेलन परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. रा. श्री. जोग यांचे अध्यक्षतेखाली झालें. त्याच वेळीं झालेल्या कवि-संमेलनाच्या अध्यक्षस्थानीं पत्रिकेचे संपादक, राजकवि, यशवंतराव पेंढारकर हे होते. संमेलनाच्या अवधींतच परिषदेच्या कार्यकारी मंडळाची सभा झाली. डॉ. ना. दा. सावरकर, विदर्भांतील कार्यकर्ते ना. कृ. दिवाणजी, पुणें येथील वा. म. पोतदार व नाथ निफाडकर यांच्या निधनानिमित्त दुःख-प्रदर्शक ठराव संमत झाले इतरहि कामें झालीं.

---

# नवीन सभासद

## तहह्यात

(१) श्री. रामचंद्र न्याहालचंद्र बुंदेलखंडी, चाळिसगांव ( पू. खा. )
(२) डॉ. भालचंद्र काशिनाथ मोडक, मु. पो. कल्याण ( ठाणें )
(३) श्री. श्रीकृष्ण नारायण चापेकर, ६३११११ माडीवाले कॉलनी, पुणें २

## साधारण सभासद

(१) श्री. रा. ल. महाबळ, विद्यापीठ हायस्कूल, कोल्हापूर.
(२) श्री. विठ्ठल तुकाराम कोल्हापूरे, मांड्याचे व्यापारी, पानलेन, कोल्हापूर.
(३) श्री. गणेश विष्णु केतकर, नवीन समर्थ विद्यालय, तळेगांव ( पुणें )
(४) सौ. लीला रेळे, C/o मेजर रेळे, ३१ काहून रस्ता, पुणें.
(५) श्री. मुरलीधर कृष्णाजी देशपांडे, कलेक्टर अँड डि. मॅजिस्ट्रेट, सुरत.
(६) श्री. भिकाजी लक्ष्मण कवडी, वकील, सोलापूर, दक्षिण कसबा, सोलापूर.
(७) श्री. गंगाधर विष्णु ठेकेदार, १७ नवी पेठ, सोलापूर.
(८) डॉ. सदाशिव बाळकृष्ण लेले, २७ स्टेशन रोड, सोलापूर.
(९) श्री. रंगनाथ माधवराव वैद्य, २०८ द. कसबा, सोलापूर.
(१०) श्री. चन्नबसव अन्दप्पा भोगडे, ४४८ अ, उत्तर कसबा, सोलापूर.
(११) सौ. इंदिरा दत्तात्रय जोग, ३६६।९ नारायण, पुणें.
(१२) सौ. के. टी. सातारवाला C/o कलेक्टर ऑफ डांग जिल्हा, आहवा ( डांग )
(१३) श्री. नारायण भगवन्त दीक्षित, ऑर्गनायझर, डांग सेवा मंडळ, आहवा ( डांग )
(१४) सौ. विमल कृष्णराव मोहिले, आहवा ( डांग )
(१५) श्री. सदाशीव नारायण क्षेमकल्याणी, C/o डे. एज्यु. इन्स्पेक्टर, आहवा ( डांग )
(१६) श्री. जगदीशचंद्र जयंतिलाल दवे, माणेकवाडी, भावनगर ( सौराष्ट्र )
(१७) सौ. सुशिला लिमये, ११८७।२० घोलेरोड, पुणें ५.

---

# — संपादकीय —

## सोलापुरांत संमेलनांचा चतुरंग मेळावा

डिसेंबर दि. २४, २५ व २६ रोजीं सोलापूर येथे जिल्हा साहित्य संमेलन, जिल्हा कविसंमेलन, त्याचप्रमाणे पत्रकार व मुद्रण संमेलन अशीं चार संमेलने मोठ्या उत्साहाने पार पडलीं.

म. सा. परिषदेची शाखा–सभा सोलापूर येथे आहे. तिने साहित्य संमेलन व कवि संमेलन भरविण्याचें ठरवून, मराठी पत्रकार परिषद सोलापूर शाखा आणि सोलापूर छापखाना मालक संघ यांचें सहकार्य मिळवून हा संयुक्त सोहळा घडवून आणला. पत्रकार व मुद्रक यांचे प्रपंच आणि प्रश्न इतके व्यापक आणि निकडीचे होत चालले असल्यामुळे त्यानी स्वतंत्र संस्था स्थापाव्यात हें रास्तच होय. तथापि परस्परांत विचारविनिमय होऊन जवळीक निर्माण होणें अवश्य आहे. त्या दृष्टीने सोलापुरच्या कार्यकर्त्यांनी केलेला हा उपक्रम अभिनंदनीय व अनुकरणीय आहे.

साहित्य संमेलनाचें अध्यक्षस्थान प्रा. रा. श्री. जोग ह्यांनी मंडित केले होतें. म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळांचे आपण अध्यक्ष आहोंत ह्या जाणिवेने, त्यांनी आपल्या भाषणांत भाषावार प्रांतरचनेचा पुरस्कार केला. आजचा निकडीचा प्रश्न म्हणून ह्या विषयाचें सोलापूर-जिल्हा–वासियांना फार महत्त्व वाटत होतें. प्रा. जोग ह्यांनी अत्यंत समतोलपणें तात्त्विक विवेचन करून भाषास्वातंत्र्य–म्हणजेच भाषावार प्रांतरचना–म्हणजे संयुक्त महाराष्ट्र अस्तित्वांत आल्याशिवाय खरेखुरें स्वातंत्र्य लाभलें असें म्हणतां येणार नाही असें प्रतिपादन केलें.

' मराठी कादंबरीची वाढ योग्य दिशेने होत आहे काय ' आणि ' सांप्रतचें टीकावाङ्मय साहित्याला पोषक आहे काय ? ' ह्या विषयावर साहित्य संमेलनांत चर्चा झाली.

कविसंमेलनाच्या अध्यक्षपदीं कवि यशवंत यांची योजना झाली होती. मराठी कवितेंत अलीकडे अगदी नवीन कवितेचें युग सुरू झालें आहे. त्याच्या रोखाने, त्यांनी कविमनाची घडण सांगून कवितानिर्मितीची प्रक्रिया विशद केली. छंद, प्रतिमा, प्रतीक, भाषा यांचें त्या प्रक्रियेच्या अनुषंगाने क्रमवार विवेचन करून त्यांच्या संभवाची उपपत्ति व सामर्थ्याची कल्पना श्रोत्यांना करून दिली. मानवीजीवनमूल्यें आणि समाजाभिमुखता यांना काव्यांत कसें नि कोठें स्थान आहे तें सांगून आज जीवन उध्वस्त झालेलें दिसत असलें तरी, ठिकऱ्या-ठिकऱ्यांच्या जुळणींतून ज्याप्रमाणे गालिचासारखी नक्षीदार भव्य जमीन घडवितां येते त्याप्रमाणे जीवनाच्या नव्या उभारणीची उभारी काव्यकलेंत दिसून आली पाहिजे असा त्यांनी आपल्या व्याख्यानाचा समारोप केला.

कविसंमेलनांत " केशवसुतांचें युग संपलें काय " ह्या विषयावर चर्चा झाली. ह्या निरनिराळ्या चर्चांमध्ये प्रा. अरविंद मंगरूळकर, प्रा वि. म. कुलकर्णी, कवि मनमोहन, कवि बोरकर, प्रा. वा. दा. गोखले, श्री. मो. रा. वाळंबे, श्री. कवडी, श्री. कामतकर,

प्रा (कु.) किर्लोस्कर, श्री. देशपांडे, वगैरे साहित्यिकांनी भाग घेतला होता. श्री. बाबूराव जक्कल हे साहित्यसंमेलनाचे व कवि कुंजविहारी हे कविसंमेलनाचे स्वागताध्यक्ष होते. नगराध्यक्ष श्री. बुर्गूल ह्यांनी साहित्यसंमेलनाचें व श्री. कवडी वकील ह्यांनी कविसंमेलनाचें उद्घाटन केलें.

पत्रकार संमेलनाचे अध्यक्ष श्री. द. शं. पोतनीस ( नाशिकच्या गांवकरी पत्राचे संपादक ) होते. त्यांनी आपल्या भाषणांत जिल्ह्यांतील वृत्तपत्रांच्या व वार्ताहरांच्या कार्याचें स्वरूप कसें असावें ह्यासंबंधींच्या विवेचनावर प्रामुख्याने भर दिला होता. ह्या संमेलनाचें उद्घाटन मुंबईच्या लोकमान्य दैनिकाचे संपादक श्री. पां. वा. गाडगीळ ह्यांनी केलें. साहित्यसंमेलनाला जोडूनच पत्रकार संमेलन भरविण्याची योजना आपणाला फार आवडली असें सांगून साहित्यिक आणि पत्रकार ह्यांचें साहचर्य घडणें कसें अवश्यक आहे ह्याचें त्यांनी स्पष्टीकरण केलें. दैनंदिन धिसाडघाईत वृत्तपत्रकारांना भाषा व शुद्धलेखन ह्यांकडे लक्ष द्यायला अवसर नसतो हें खरें असलें तरी साहित्यिकांनी वृत्तपत्रकारांना ह्या बाबतींत वेळोवेळीं दोषदिग्दर्शनाने जागें केलें पाहिजे; वृत्तपत्रकारांना नुसतेंच हिणवून किंवा तुच्छ लेखून चालावयाचें नाही; त्यांच्या पराक्रमाची जाणीव ठेवून त्यांना आपल्याकडे वळवून घेतलें पाहिजे; असा त्यांच्या प्रतिपादनाचा आशय होता.

कवितावाचन, भावगीतगायन, वादन, नृत्य, नाटिका वगैरे मनोरंजनाचे विविध कार्यक्रमहि दररोज रात्रीं झाले.

## जिल्हा मुद्रण संमेलनांत—

मालक व कामगार ह्यांच्या प्रश्नोप्रश्नांची चर्चा सभासदांच्या बैठकींत झाली. पुण्याहून राजगुरू प्रेसचे श्री. गानू, आर्यभूषणचे श्री. पटवर्धन, चित्रशाळेचे श्री. दा. पां. रानडे, श्री. लक्ष्मणराव केळकर, प्रतिभा प्रेसचे जोशी, ग्रामोद्धारचे संपादक, वगैरे मंडळी बाहेर गांवाहून आलेली होती. एक प्रेक्षणीय साहित्य प्रदर्शनहि ह्या संमेलनांत थाटलें होतें. पुढील वर्षीच्या संमेलनासाठी बार्शी येथील श्री. सुलाखे ह्यांनी आमंत्रण दिलें.

हा सोहळा सिद्धीस जाण्यासाठी भिन्न भाषिक व भिन्न जातीय सद्गृहस्थांनी कायावाचामनें सहकार्य करून आर्थिक भारहि आपुलकीने उचलला होता. सुहृद्भावाची ही साक्ष सर्वांनाच मोठी कौतुकाची वाटली.

* * * *

## कै. प्रा. ना. कृ. दिवाणजी

विदर्भ साहित्य संघाचे एक उत्साही कार्यकर्ते यांना मोटार अपघातामध्ये मरण आलें हें वाचून आम्हांस धक्काच बसला. वऱ्हाड-शालापत्रक याशी कै. दिवाणजी यांचा निकटचा संबंध होता. इतर ठिकाणींहि त्यांनी अनेक लेख लिहिले होते. स्वराज्य-प्राप्तीनंतर कै. दिवाणजी मध्यप्रांत सरकारच्या शिक्षणखात्यांत नियुक्त झाले व कांहीं काळ महाविद्यालयांत ते अध्यापनाचें काम करीत होते. शिक्षण-प्रसाराच्या कार्यासाठी प्रवास करतांना काळाने त्यांच्यावर अचानक झडप घालावी हे दैवदुर्विलसितच म्हणावयाचें. प्रा. दिवाणजी यांच्या निधनाने मराठी भाषेची व विदर्भ साहित्य संघाची फार मोठी हानी झाली आहे.

## कै. वा. गो. आपटे विश्वस्त मंडळाचें अभिनंदन

कै. वासुदेव गोविंद आपटे यांनी मराठी वाङ्मयाची फार मोठी सेवा केली आहे. बालवाङ्मयाचीं अनेक पुस्तकें लिहून, 'आनंद' मासिक चालवून व इतरहि अनेक ग्रंथ मराठींत लिहून त्यांनी पैसा मिळविला. त्यांची राहणी साधी व काटकसरीची होती. त्यामुळे कांही पैसा शिल्लक टाकून मृत्युसमयीं त्यांनी विश्वस्त मंडळाच्या ताब्यांत तो निधि दिला. मध्यम वर्गीतील गृहस्थानें जमविलेली संपत्ति समाजकल्याणासाठी खर्च करण्याची योजना करणें हेंच मोठेपणाचें लक्षण होय. कै. आपटे यांनी नेमलेल्या विश्वस्त मंडळाने वासुदेवरावजींची मनीषा ओळखून जमलेल्या निधीचा उपयोग एका महनीय कार्यासाठी केला याबद्दल आम्ही त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों. या निधींतून पुणें विद्यापीठाला एक लक्ष रुपयांची देणगी संस्कृत-मराठी भाषांच्या अध्ययनाला प्रोत्साहन मिळावें म्हणून विश्वस्तांनी दिली आहे. महाराष्ट्र साहित्य परिषदेलाहि त्यांनी दहा हजार रुपयांची देणगी दिली. त्यांतून कै. वा. गो. आपटे संदर्भ-ग्रंथ-संग्रह तयार होत आहे.

## कै. एकनाथ यादव निफाडकर

नाथ निफाडकर ह्या संक्षिप्त नावाने मशहूर असलेले गेल्या पिढींतील कवि ह्या ( डिसेंबर ) महिन्यांत दिवंगत झाले. सुरवातीस सुस्थितींत असलेल्या ह्या साहित्यिकाच्या आयुष्याचा उत्तरार्ध अत्यंत हलाखींत चालला होता हे ज्यांना माहीत असेल ते " गेला कवीश्वर, बरा सुटला बिचारा ! " असेंच म्हणतील. स्फुट कविता, खंडकाव्यें, कादंबरी अशा अनेक प्रकारांनी त्यांनी साहित्यनिर्मिती केली असून लोकमान्य व वाङ्मय ही नियत कालिकेंहि जन्माला घातली होती. त्यांचा कोणताहि उद्योग अल्पायुषी व आतबट्ट्याचा व्हावा असाच असे. विचारांचें स्थैर्य, उद्योगाचें सातत्य, व्यवहारी सुसूत्रपणा ह्या गुणांचा अभाव आणि अहमन्यता व विक्षिप्तपणा ह्यांची जोड, ह्यामुळे त्यांची सर्व परींनी वाताहात झाली. तथापि त्यांची कविप्रकृति आणि काविपदावरील दुरंत निष्ठा कुणीहि नाकारू शकणार नाही. अत्यंत केविलवाण्या परिस्थितींत आयुष्याची अखेर भोगलेल्या ह्या त्रस्त आत्म्यास ईश्वर शान्ति देवो.

* * *

## प्राच्यविद्या परिषद्

नोव्हेंबरमध्ये मुंबई येथे भरलेल्या परिषदेसाठी परिषदेचे चिटणीस प्रा. अ. गं. मंगळूरकर हे उपस्थित होते. त्यांनी संगीतांतर मीमांसा या विषयावर निबंध वाचला.

## लिपि-सुधारणा समिति

परिषदेचे चिटणीस प्रा. वा. दा. गोखले यांनी या समितीच्या बैठकींत भाग घेतला. समितीचा अहवाल सरकारला सादर करण्यांत आला.

---

# साभार-स्वीकार

१. हिंदुस्थानचा साधनरूप इतिहास- संपा. प्रा. शं. दा. चितळे व प्रा. रा. वि. ओतूरकर; अनाथ विद्यार्थी-गृह प्रकाशन, पुणें २; मूल्य ५ रु.

२. अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक (तृतीय खंड) - ग्रंथकर्ता व प्रका. गं. दे खानोलकर, स्व. पब्लि. हाऊस, केळेवाडी, मुंबई ४; मूल्य ४ रु.

३. हिंदी बालबोध व्याकरण - ले. व प्रका. भा. के. वोकील, न्यू इं. स्कूल, सातारा; मूल्य ८ आणे.

४. मी कां लिहितों (भाषणसंग्रह)- प्रका. न. मा. कुळकर्णी, प्रतिभा प्रकाशन, औरंगाबाद; मूल्य ३ रु.

५. नंदूचा बंडू — [ले. आनंदीबाई जयवंत, प्रका. के. भि. ढवळे, मूल्य ॥ रु.]

६. वृत्तें व अलंकार (द्वितीयावृत्ति ले. प्रा. वि. म. कुळकर्णी; प्रका. एन्. के. पब्लि. हाऊस, पुणें २; मूल्य १२ आणे.

७. ग्रंथ व ग्रंथालयें (विविधलेख संग्रह) प्रका. किताबमिनार प्रकाशन, पुणें २; मूल्य २॥ रु.

८. स्मृतिकालीन कायदा - ले. रा. के. रानडे; प्रका. सेंट्रल लॉ हाऊस, टिळक रस्ता, नागपूर; मूल्य ३ रु.

९. पं. शिवनाथ शास्त्री - ले. व प्रका. श. वि. जोग, बंडगार्डन रोड, पुणें १ मूल्य ४ आणे

१०. शिववाचे शिलेदार - ले. गो. नी. दांडेकर, प्रका. स. के. ब्रोडस, ५५५ नारायण, पुणें २; मूल्य १॥। रु.

११. पंचवीस वर्षांनंतर — ले. वि. पां. दांडेकर. प्रका. के. भि. ढवळे, मुंबई. मूल्य ४॥। रु.

१२. नवी सजावट — ले. स. अ. शुक्ल, प्रका. के. भि. ढवळे, मुंबई. मूल्य ३ रु.

१३. नाटक — [ले. स. अ. शुक्ल. प्रका. के. भि. ढवळे, मुंबई ४. मूल्य ।= रु]

१४. कस्तुरी (ललित विचार तरंग) ले. ह. वि. वाडेकर; प्रका. मेसर्स जोशी-लोखंडे, ३३५ शनिवार, पुणें २; मूल्य १॥ रु.

१५. काळ (कविता) - ले. शाहीर रेणापूरकर, प्रका. ह. ह. रेणापूरकर, लातूर; मूल्य २ रु.

१६. फुलांचे अश्रु (द्वितीयावृत्ति) - कवि. सी. म. बापट, समर्थ प्रकाशन, बेळगांव, मूल्य २॥ रु.

१७. श्री संजीवनीहरण (काव्य)- कवि वि. गो साठये; प्रका. स्नेहसंवर्धक संघ, मिरज; मूल्य ३ रु,

१८. पाश्चात्य काव्यकथा — सुशील परभृत, प्रका. गं. गो. कुंटे, ३५२ शनिवार, पुणें २; मूल्य २॥ रु.

१९. अखेरचा शाहीर — सुशील परभृत; परभृत प्रकाशन, ११०।५ सदाशिव, पुणें २; मूल्य २ रु.

२०. कविता कशी शिकवावी ? — ले. ना. ध. पाटील; प्रका. लेखनवाचन भांडार, लक्ष्मीपथ, पुणें २; मूल्य १॥ रु.

२१. निळी फाईल (नाटिका) — ले. वा. रा. ब्रिवलकर; प्रका. नागेशराव जोशी, ४०९ सदाशिव, पुणें २; मूल्य ८ आणे.

२२. मराठी नाट्य प्रवेश (भाग १ ला)— संपा. वि. द. साठे; प्रका. आदर्श मुद्रणालय, ३९५।५ सदाशिव, पुणें २; मूल्य १॥ रु.

२३. संसारांत पदार्पण— ले. सौ.

मालतीबाई दांडेकर; अ. वि. गृह प्रकाशन, सदाशिव, पुणें २; मूल्य २। रु.

२४. पाणकळा ( कादंबरी २ री आवृत्ति )—ले. व प्रका. र. वा. दिघे, विहारी, खोपोली, मूल्य ४॥ रु.

२५. कडूसाखर—ले. ग. ल. ठोकळ; प्रका, द. र. कोपर्डेकर, ५२९ सदाशिव, पुणें २, मूल्य ३ रु.

२६. बुरुजावरील गूढरहस्य—ले. बलभीम कोणेकर; प्रका. अनंत माला, मठ गल्ली, बेळगांव; मूल्य १ रु.

२७. पहिली पायरी ( नाटक )—ले. ना. धों. ताम्हनकर; प्रका. द. र. कोपर्डेकर ५२९ सदाशिव, पुणें २; मूल्य १रु.

२८. राजकवि तांबे यांचा साहित्य-विषयक पत्रव्यवहार—संपा. ना. बा. पराडकर; प्रका. शारदोपासक मंडळ, लष्कर-ग्वाल्हेर; मूल्य २॥ रु.

२९. पत्रकार—ले. ज. पां. देशमुख; अ. वि. गृह प्रकाशन, सदाशिव. पुणे २; मूल्य १। रु.

३०. आग्याहून सुटका मार्गदर्शन—ले. शं. ना. सहस्रबुद्धे; विदर्भ नाट्यमंदिर प्रकाशन, अमरावती; मूल्य १२ आणे

३१. भाषाशास्त्रप्रवेश—ले. गं. भा. निरंतर, प्रका. पां. रा. ढमढेरे, ६२२।३ सदाशिव, पुणें. मूल्य २ रु.

३२. जीवनगंगा— ( सातारा न्यू इं. स्कूल सुवर्ण महोत्सव-प्रकाशन )

३३. छोटा छब्या—ले. शं. रां. देवळे प्रका—मेसर्स जोशी-लोखंडे, पुणें २, मूल्य ८ आणे.

३४. वडा दादा—ले. शं. रा. देवळे प्रकाशक—मेसर्स जोशी-लोखंडे, पुणे २; मूल्य ८ आणे.

३५. प्रीतीची रीत — [ ले. वि. सी. गुर्जर. प्रका. के. भि. ढवळे, समर्थ सदन, मुंबई ४. मूल्य ५॥ रुपये ]

३६. चित्रा —[ ले. बा. कृ. गलगली. प्रका. के. भि. ढवळे, मुंबई ४. मूल्य ३॥ रु.

३७. तीन रत्नें आणि इतर गोष्टी ( बाल वाङ्मय )—[ ले. शं. रा. देवळे. ल. रा. गोडबोले. प्रका. कर्नाटक पब्लिशिंग हाऊस. समर्थ सदन, मुंबई ४. मूल्य ।= रु.]

३८. मानसशास्त्रप्रवेश ( भाग १ व २ ) — [ ले. प्रि. शरयू बाळ व प्रा. वा. दा. गोखले, प्रका. ल. ना. चापेकर आर्यसंस्कृति मुद्रणालय, १९८।१७ सदाशिव पुणें २. मूल्य ५ रुपये. ]

---

## दिवाळी अंक

(१) किर्लोस्कर (२) स्त्री (३) मनोहर (४) युगांतर (५) सत्यकथा (६) वाङ्मय-शोभा (७) अर्थ (८) रोहिणी (९) प्रसाद (१०) ग्रामराज्य (११) सह्याद्रि (१२) मौज (१३) काळ (१४) चिकित्सक (१५) तुषार (१६) सुषमा (१७) भवितव्य (१८) तरुण भारत (नागपूर) (१९) रयत (२०) ज्ञान-प्रकाश (२१) महाराष्ट्र (नागपूर) (२२) महाराष्ट्र-विस्तार (२३) समाधान (२४) श्रीगुरुदेव (२५) माउली (२६) अखंड भारत (२७) धनुर्धारी (२८) साहित्य (२९) नवयुग (३०) चित्रमय जगत् (३१) कुमार (३२) एकता (३३) संजीवन (३४) चित्ररेखा (३५) पराग (३६) दीपावली (३७) अभिरुचि.

विशेषांकः— (१) विवेक ( दसरा ). (२) यशवंत (दसरा ) (३) रोहिणी ( संघ ).

शिक्षणसंस्थांचीं नियतकालिकें:—

(१) प्रभ ( विवेक वर्धिनी शिक्षण-संस्था, हैद्राबाद) (२) विकास (रास्ता पेठ एज्यु. सो. हायस्कूल, पुणें २.) (३) नवरस ( औरंगाबाद विद्याकुल. ) (४) समाजपत्रिका ( मद्र–अहमदाबाद ).

---

